## दोन शब्द

चांडिल येथें पांचवें सर्वोदय-सम्मेलन मार्च १९५३ या महिन्यांत ता. ७-८-९ या तीन दिवशीं भरलें. या सम्मेलनांत झालेलीं विनोबांचीं तीन प्रवचनें या पुस्तकांत दिलीं आहेत. मूळ प्रवचनें हिंदींत झालीं. त्या प्रवचनांचें हें मराठी भाषांतर मराठी वाचकांचे सोईकरितां केलें आहे. भाषांतर विनोबांनीं पाहिलेलें नाहीं. कांहीं दोष राहून गेले असल्यास पुढील आवृत्तींत दुरुस्त केले जातील.

— प्रकाशक

## —: अनुक्रमणिका :—





# प्रवचन पहिलें

## ईश्वरानें सोपवलेलें कार्य

शरीर काहीसे अशक्त आहे, अशा परिस्थितीत मी आज आपल्यासमोर उपस्थित आहे, याबद्दल आपली क्षमा मागतो. माझें म्हणणे थोडक्यात सांगावें अशी माझी इच्छा आहे त्यापूर्वी शंकरराव देवाच्याप्रमाणेच मीहि पूज्य किशोरलालभाई यांचें स्मरण करूनच माझे भाषण सुरू करितो. जे एक महान् कार्य ईश्वराने आमच्यावर सोपविले आहे आणि ज्याची आम्ही ईश्वराला आणि जनतेला साक्षी ठेवून दीक्षा घेतली आहे, त्या भूमिदानाच्या कामात किशोरलालभाई अत्यंत तन्मय झाले होते. ‘ कर्मामध्यें अकर्म होऊ शकते व अकर्मामध्यें कर्म होऊ शकते, ’ हे जीवनाचे सूत्र, आपल्याला गीतेने दिले आहे. किशोरलालभाई शरीराने पंगू होते म्हणून ज्याला आपण स्थूल कर्म म्हणतो, ते ते फारसे करू शकत नव्हते. ते चोवीस तास काहीना काही करीतच असत. तरी पण त्या कर्माचा स्थूल आकार विशेष मोठा दिसत नसे. परंतु त्यांनी आम्हाला असे दाखवून दिले आहे की, कर्म न करिताहि केवढे महान् कार्य होऊ शकते ! ज्याचे हृदय निर्मल असते, परमेश्वर कृपेने ज्याचे रागद्वेष धुवून गेले आहेत, अशा मनुष्याचें केवळ अस्तित्वच पुष्कळसें काम करीत असतें. असे जे थोडे लोक जगांत अवतरतात, त्यामध्यें मी किशोरलालभाईंची गणना करितों. बापूच्या मागे आम्हांला त्यांचाच आधार होता आणि आपल्या सहज सौजन्याने आम्हांला ते सांभाळून घेत होते. इतकी शक्ति आम्हांपैकीं दुसऱ्या कोणामध्ये अजूनपर्यंत प्रगट झालेली नाही.

म्हणून त्याची उणीव आम्हाला जाणवत आहे व जाणवत राहील. आपआपसातला सद्भाव आणि सौहार्द यानीच आपण त्या उणीवेची भरपाई करू शकू अशी मला आशा आहे; म्हणजे आपल्या हातून ईश्वराचें कार्य सिद्धीस जाईल.

## जगाकडे डोळेझाक करून भागणार नाहीं

आपण एक कार्यकर्त्यांची जमात आहों. येथें समेलनाला आलों म्हणजे थोडे बोलतोहि. पण हे बोलणेहि आमचे कामच असतें. ते काही केवळ वक्तृत्व होऊ शकत नाही. कर्तृत्वाचाच ते एक भाग असते. असे जे आम्ही लोक एकत्रित येतो ते वर्ष-भर जे काम आपण करितो, ते नारायणाला अर्पण करावे आणि पुढील वर्षाच्या कामाकरिता स्फूर्ति मिळावी या इच्छेने येतो. अशा प्रसगी कांही विचारविनिमय—विचाराची देवाणघेवाण—आपण करीत असतो. आज आपण या दृष्टीने आपल्या कामामागे जी भूमिका आहे ती पाहिली पाहिजे आणि आपल्या कामाचेंहि सशो-धन केले पाहिजे. कार्यपद्धति, कार्यक्रम व कार्यरचना या तीन्ही विषयीहि आपण थोडा विचार केला पाहिजे. आपण जगाच्या एखाद्या दूर कोपऱ्यांतहि काम करीत असलों, तरी साऱ्या जगाकडे नजर टाकल्याशिवाय आमचे काम चालणार नाही. अशी आज जगाची स्थिति आहे .जगामध्ये ज्या शक्ति काम करून राहिल्या आहेत, जे नवे प्रवाह सुरू आहेत, ज्या कल्पना आणि भावनाचा सस्पर्श आणि सघर्ष होऊन राहिला आहे त्यांकडे लक्ष देऊनच, त्यावर सतत नजर ठेऊनच आपले छोटेसे पाऊल आपण टाकले पाहिजे. योग्य दृष्टिविना केलेले काम आधळें होईल. याकरिता जगाच्या परिस्थितीचाहि विचार करणे जरूर आहे. आज आपण

पहातच आहो की, जगाची स्थिति किती चचल आहे. काहीशी स्फोटकहि आहे. अनेक सकटें समोर उभी आहेत. कोणत्यावेळी ज्वालामुखीचा स्फोट होईल हे सागतां येत नाही. हे निष्कारण भयानक चित्र मी काढलेले नाही. त्यामुळे भयभीत होण्याची माझी इच्छा नाही व आपल्यालाहि मी भयभीत करू इच्छित नाही. परन्तु जी स्थिति आहे तिच्याकडे मात्र लक्ष वेधू इच्छितो. जगामध्ये कोणच्यावेळो काय होईल हे आपण सागू शकत नाही, अशी अस्थिर परिस्थिति जगामध्ये आज आहे.

एकदोन महिन्यापूर्वीची गोष्ट आहे. दिल्लीमध्ये कित्येक ज्ञानी, विद्वान लोक एकत्रित जमले होते आणि त्यानी अहिसेच्या दर्शनासबधी काही चितन, मनन आणि विचार केला. त्याच्या-मध्ये आपले पूज्य राजेंद्रबाबू यानी असा उल्लेख केला की, "आज कोणताहि देश अशी हिमत बाळगीत नाही की, आम्ही सैन्याशिवाय राज्य चालवू." गाधीजीची शिकवण त्याच्या स्वतःच्या मुखातून आपण स्वतःच्या कानानें ऐकली आहे, आणि त्याच्या बरोबर काही कामहि केले आहे, तरी आम्ही देखील अशी छाती करू शकत नाही ! याबद्दलहि त्यानी दुःख प्रगट केले. आपले महान नेते पडित नेहरू अनेक वेळा बोलले आहेत की, जगातील कोणचाहि प्रश्न शस्त्रबलाने सुटू शकत नाही. आज देशाचें नेतृत्व जे करीत आहेत, आणि ज्यांच्यावर जबाबदारी आहे अशा आपल्या मंत्र्याचा अहिसेवर दृढ विश्वास आहे ! पण परिस्थिति अशी आहे की, सेना तयार करणें, ती वाढविणे व तिला मजबूत करणें ही जबाबदारी त्यांना मानावी लागत आहे. अशा तऱ्हेच्या विचित्र परिस्थितीमध्यें आपण आहोंत.

## श्रद्धा एकीकडे नि क्रिया भलतीकडे

श्रद्धा एका वस्तूवर आहे असा आभास होत आहे, तर क्रिया मात्र दुसरीच करावी लागत आहे ! सर्व जगामध्ये आणि हिंदुस्थानामध्ये अहिंसेचेच राज्य चालावे अशी इच्छा आहे. आपण एकमेकाला भिऊ नये; दुसऱ्याला प्रीतीने जिंकावे, प्रीतीच यशस्वी होऊ शकते आणि जिंकू शकते; असा विश्वास हृदयामध्ये भरलेला आहे. पण दुसरीहि एक वस्तु आमच्यामध्ये आहे. तिला बुद्धि असे नाव दिले जाते. तसे म्हटले तर बुद्धि ही हृदयाचाच एक भाग आहे, आणि हृदयहि बुद्धीचा भाग आहे. ही दोन्हीहि मिळलेली–जुळलेली आहेत. तरीहि हृदय सांगते की, "हिंसेने कोणचाहि प्रश्न सुटत नाही. एक सुटला असे दिसावे तो त्यातूनच पाच पन्नास नवीन प्रश्न उत्पन्न होतात !" परंतु बुद्धि ही तीनहि गुणानी भरलेली आहे. तिच्यामध्ये काही विचार करण्याची शक्ति आहे, कोठे ती शक्ति झाकून गेली आहे; कोठे तिला नीट दिसते; कोठे तिला भूल पडते. अशी आमची समिश्र बुद्धि आम्हांला सांगत आहे की, आम्ही सेना काढून टाकू शकत नाही. जनता अजून तितकी बळकट नाही व तिजमध्ये तितकी पात्रताहि नाही. अशा जनतेचे प्रतिनिधि या नात्याने आमच्यावर अशी जबाबदारी येते की, आम्ही लष्कर तयार करावें, वाढवावें आणि मजबूत करावें. अशी परिस्थिति आहे. इच्छा तर आहे की, रचनात्मक काम करावें, पण ती मनांतली इच्छा आहे. बुद्धि म्हणते की, सेना तयार ठेवली पाहिजे. ज्यायोगें सेनायंत्र मजबूत होऊं शकेल अशा यंत्रानाहि स्थान दिलें पाहिजे. ज्यांची चरख्यांवर श्रद्धा विशेष नाही, त्याची गोष्ट मी सोडून

देतों; पण ज्यांची चरख्यावर पूर्ण श्रद्धा आहे अशा आम्हांला असा सवाल विचारला गेला की, चरखे आणि ग्रामोद्योग यांच्या सहाय्याने आपण युद्ध--यत्र मजबूत बनवू शकतां काय ? युद्ध-यत्र उभे करू शकता काय ? तेव्हा बुद्धि सांगते की, "नाही. या छोटयाछोटया उद्योगाच्या सहाय्याने आम्ही युद्ध-यत्र तयार करू शकत नाही"

## कम्यूनिटी प्रॉजेक्ट

'कम्यूनिटी प्रॉजेक्ट' आतां केवळ मूठभर खेडयामध्ये सुरू झाला आहे. पण पांच लाख खेडयांमध्ये तो पसरावा आणि त्याच्यायोगे राष्ट्र समृद्ध व्हावे; गरिबी नाहीशी व्हावी, अशी इच्छा आहे. परतु जर का उद्या जगामध्ये महायुद्ध सुरू झाले तर आपण सागू शकत नाही की, एक तरी 'कम्युनिटी प्रॉजेक्ट' चालू राहील. ज्यानी या योजनेचा उपक्रम केला आहे ते देखील हा चालू राहील असे सागू शकत नाहीत. ताबडतोब बुद्धीचा जोर होईल, हृदय मागे पडेल. हृदयांवर बुद्धि स्वार होऊन जाईल आणि म्हणेल की, आता तर राष्ट्र-रक्षण हीच मुख्य गोष्ट आहे. हे मी आत्मनिरीक्षण म्हणून बोलत आहे जे लोक आज जबाबदारीच्या स्थानावर आहेत त्या जागी आम्ही असतो तर आम्हीहि आज ते जे करीत आहेत, त्यापेक्षा विशेष काही वेगळें करू असे सागता येत नाही. ते स्थानच असें आहे-ती जादूची खुर्ची आहे. तिच्यावर जो बसेल त्याला एका सकुचित, मर्यादित, परतंत्र वर्तुळातच विचार करणे भाग पडते. या वर्तुळाला मी परतत्र असे नांव देतो. त्या वर्तुळांत ज्या दिशेकडे जगाचा ओघ वहात असलेला दिसतो त्याच दिशेने विचार करणेची जबाबदारी लाचारीने येते.

## भीतीमुळें सैन्य बळाची वाढ

अमेरिकेसारखी मोठी मोठी राष्ट्रे रशियासारख्या राष्ट्राला भितात. प्रत्येकजण एकमेकाला भितो. पाकिस्तान हिंदुस्थान-सारखी कमी शक्तिशाली राष्ट्रेहि अशीच भीति बाळगतात यांप्रमाणे एकजण दुसऱ्याला भिऊन शस्त्रबलाने, सैन्यबळाने कोण-चाहि प्रश्न सुटत नाही, असा विश्वास ठेवूनहि आम्ही शस्त्रबळ आणि सैन्यबल यावरच विसबून रहात आहोंत. त्याचा आधार सोडू शकत नाही. अशा विचित्र परिस्थितीमध्ये आम्ही आहो जर कोणी आम्हाला दांभिक म्हटलें, ढोंगी म्हटले, तर त्याचा असे म्हणण्याचा हक्क सिद्ध होईल. मात्र त्याचे म्हणणे खरे नाही आमच्या मनामध्येंच जर दुसरी गोष्ट असती आणि जाणून बुजून आम्ही तो लपवीत असतों, तर आम्ही ढोंगी ठरू. परंतु या ठिकाणी मन ही गोष्ट कबूल करीत आहे आणि परिस्थितिजन्य बुद्धि दुसरी गोष्ट सांगत आहे, म्हणून लाचारीने दुसरी गोष्ट करावी लागत आहे. ही दांभिक स्थिति नाही, परंतु दयाजनक स्थिति आहे. अशा दयाजनक स्थितिमध्ये आपण आहोंत. आताच बाबूजींनी सांगितले की, सर्वोदय समाज आपल्या मूळ विचारा-वर कायम रहावा आणि आजच्या परिथितीमध्ये ते विचार अमलात आणण्याकरितां त्याने वातावरण तयार करावें. अशी त्या समाजाकडून लोक आशा बाळगीत आहेत. जर सर्वोदय समाज हें करील तर आपल्या राष्ट्रीय सरकारला सर्वोत्तम मदत होईल. सैन्यबलाशिवाय ज्याप्रकारचा समाज बनू शकतो त्या दिशेने काम करण्यामध्ये सरकारला जितकें सहाय्य होईल, तितकें सहाय्य आमच्यापैकी कोणी स्वतः मंत्री झाला तरी त्याच्या हातून होणार नाहीं.

कधीकधी लोक मला विचारतात की, " आपण बाहेर का राहता ? राज्यकारभार चालविण्याची जबाबदारी तुम्हीच का घेत नाही?" मी सांगतो की, "ज्या ठिकाणी गाडीला दोन बैल आधीच जोडले आहेत, त्या ठिकाणी मी तिसरा बैल बनून गेलो तर गाडीला काय मदत मिळेल ? त्या ऐवजी योग्य दिशेला जाणारा रस्ताच मी नीट करून दिला तर तिच्या प्रवासाला अधिक साहाय्य केल्यासारखे होईल. मात्र मी बैलच जर असेन तर मलाहि बैलच बनले पाहिजे. मी एक विशिष्ट भाषा बोलत आहे. मला उमेद आहे की, आपण ती भाषा सहन कराल. आमच्या संस्कृतीमध्ये बैलाला जो मान आहे तो मनुष्यालाहि नाही ! या अर्थी मी बोलत आहे जो राज्याची धुरा उचलतो त्याला आम्ही राजकार्यधुरंधर म्हणतो. धुरंधर म्हणजे बैल. तेव्हा असे धुरंधर आम्हाला बनावे लागते. परंतु जेव्हा काही लोक धुरंधर बनलेलेच आहेत, आणि ते सांगत आहेत की, आम्ही ज्या कामाला लागलेले आहोत तेच काम आपण कोणी करण्याची जरुरी नाही. परंतु ज्या उणीवा आम्हांला भासत आहेत, त्याची पूर्तता जर आपण करू शकत असाल तर ती करावी, अशा आशेने ते लोक आमच्याकडे पहात आहेत. ही गोष्ट आम्ही नीटपणे समजली पाहिजे. जिला मी स्वतंत्र लोकशक्ति म्हणतो, ती ज्यायोगे निर्माण होईल अशाच कामाला आम्ही लागले पाहिजे. तेव्हाच आपण आमच्या सरकारला खरी मदत करू आणि आपल्या देशाची योग्य सेवा करू.

### दण्डशक्ति नि लोकशक्ति

मी आताच म्हटले की, आम्हाला स्वतंत्र लोकशक्ति निर्माण केली पाहिजे त्याचा माझा अर्थ असा आहे की, हिंसा शक्तीच्या

विरोधी पण दण्डशक्तीहून भिन्न अशी लोकशक्ति आम्हाला प्रकट करावयाची आहे. साऱ्या समुदायानें मिळून दण्डशक्ति आपल्या सरकारच्या हाती दिली आहे; म्हणून ती हिंसाशक्तीहून वेगळी आहे. ह्या दण्डशक्तीचाहि उपयोग करण्याचें कारण पडू नये अशी परिस्थिति देशामध्ये निर्माण करणें आमचें काम होय ते जर आम्ही करू तर आम्ही स्वधर्म ओळखला असें होईल. जर आम्ही असें केलें नाही आणि दण्डशक्तीच्या उपयोगानेच जी जनसेवा होऊं शकते त्या जनसेवेचा लोभ धरला तर ज्या विशेष कार्याची अपेक्षा आमच्याकडून केली जात आहे, ती अपेक्षा आमच्या हातून पूर्ण होणार नाही. आम्ही एक लोढणेंच बनू, असा मात्र संभव आहे.

मी आणखी थोडें स्पष्टीकरण करितों. मी म्हटलें की, सैन्यशक्तीच्या आधारावर सेवाकार्य होऊ शकतें आणि तसे करण्याकरिताच आम्ही राज्यशासनाची इच्छा केली आणि ते हातीहि घेतलें. जोंपर्यंत समाजाला तशी जरूरी आहे तोंपर्यंत राज्यकारभाराची जबाबदारी आम्ही सोडू इच्छित नाही. यातून सेवा जरूर होईल, पण तिजमुळे दंडशक्तीचा उपयोगच करावा लागणार नाही, अशी परिस्थिति निर्माण होणार नाही. मी उदाहरण देतों. लढाई चालू आहे. शिपाई जखमी होत आहेत. त्या शिपायांच्या सेवेला जे लोक लागले आहेत ते दयेने प्रेरित झालेले असतात, शत्रू मित्रहि पहात नाहीत. आपला जीव धोक्यात घालून युद्धक्षेत्रापर्यंतहि पोचतात, आणि आईच आपल्या मुलाची जी सेवा करू शकते, अशी सेवा हे दयाळू लोक करतात. याविषयी मुळीच शंका नाही. ही सेवा मोलाची आहे, हें सर्वजण जाणतात

पण युद्ध थांबविण्याचें काम ते करू शकत नाहीत. युद्धाचा पुरस्कार करणाऱ्या लोकामध्यें असणारीच केवळ ती दया आहे. जशी एका यत्रामध्यें लहान मोठी चाकें असतात, त्यातलें एक दुसऱ्याच्या विरुद्ध दिशेने चाललेलें असतें, तरीहि तें त्या यत्राचेंच एक अंग असतें. एकाच युद्ध-यत्राचें एक अग असे आहे की, ज्याने शिपायांची कत्तल करावी आणि दुसरे अग असे की त्याने जखमी शिपायांची सेवा करावी. त्या यंत्राच्या दोन्ही गती स्पष्ट आहेत, एक क्रूर काम आहे, एक सेवेचें काम आहे, हे सर्वांना माहीत आहे. त्या दयाळू माणसाची दया आणि त्या क्रूर हृदयाची क्रूरता मिळून युद्ध बनतें. युद्ध चालविण्याचे हे दोन भाग आहेत. वैज्ञानिक कठोर भाषेत बोलायचें म्हणजे, जोंपर्यंत आमची युद्धास मान्यता आहे तोंपर्यंत आम्ही शिपायाचा पेशा घेतला काय किंवा जखमी शिपायाची सेवा करण्याचा स्वीकारला काय, दोन्हीहि युद्धगुन्हेगारच आहोंत. हे उदाहरण अशासाठी दिले की, आम्ही फक्त दयाळू कार्य करीत आहों म्हणून आम्ही दयेचें राज्य बनवू शकू असें समजतां उपयोगी नाही. राज्य निष्ठुरतेचेंच राहील. त्यामध्ये जी दया आहे ती, भाकरीमध्यें ज्याप्रमाणें चवीपुरतें मीठ घालावें तशी आहे जखमी शिपायांच्या सेवेनें युद्धामध्ये थोडी लज्जत येते इतकेंच. परंतु या दयेनें युद्धाचा शेवट होत नाहीं. जर आपण लोकांनी अशा तऱ्हेचें दयेचें काम केलें की ज्यायोगें निष्ठुरतेच्या राज्यांत दयाहि प्रजेच्या नात्यानें राहील आणि निर्दयतेच्या हुकमतीखाली चालेल तर आपण शुद्ध काम केलें असें होणार नाही. याप्रमाणें जी दयेची कामें दिसत आहेत आणि जी आपण दयेच्या आणि रच-

नेच्या लाभानें उचलीत आहोंत, त्यात जर व्यापक दृष्टि नसेल तर काही सेवा तर आपल्या हातून होईलच; पण आमच्यावर जिची जबाबदारी आहे अशी ती सेवा नाही. आणि आम्ही स्वत व जगहि जो आमचा स्वधर्म म्हणून मानीत आहे, तो पाळल्यासारखें होणार नाही.

## प्रेमशक्तीला आवाहन

आणखी एक उदाहरण देतों प्रत्येकजण मला विचारतों, "आपलें सरकारवर वजन आहे असें दिसतें, तेव्हा आपण सरकारच्या मागें लागून असा कायदा का करवून घेत नाही आणि विना कॉंपेन्सेशन जमिनीच्या वितरणाचा मार्ग का खुला करून घेत नाही ?" मी त्याना सागतो, "कायद्याचा रस्ता काही मी अडवून धरीत नाहीं. यापेक्षा जास्त एक पाऊल तुमच्या दिशेने टाकावें असें जर तुम्ही इच्छित असाल तर मी सागतों की, हा माझा धर्म नाही. मी जो मार्ग स्वीकारला आहे त्यात मला सोळा आणे जरी यश मिळालें नाही, तरी कायद्याला मदत तर होईलच. मी कायद्याच्या मार्गात अडचण उत्पन्न करीत नाही. उलट कायद्याला साहाय्यच देत आहे आणि कायदा सहज बनला जावा असें अनुकूल वातावरण निर्माण करीत आहे. याहिपेक्षा एक पाऊल पुढें टाकून 'कायद्याशिवाय काम होणार नाही, कायदा झाला पाहिजे' असें बडबडत राहिलो तर मी स्वधर्म सोडला असें सिद्ध होईल. माझा धर्म तर असे मानण्याचा आहे की कायद्याच्या मदतीशिवाय जनतेच्या हृदयामध्यें अशी भावना निर्माण करावयाची की कायदा काहीहि असो लोकांनी स्वत.च जमिनीचें वाटप करावें. कोणत्या कायद्यामुळें माता आपल्या बालकांना

पाजीत आहेत ? मनुष्याच्या जीवनांत अशी एक शक्ति आहे की जिच्यामुळें त्याचें जीवन समृद्ध झालें आहे. मनुष्य प्रेमावर भरंवसा राखतो, प्रेमानेंच वाढतो आणि जेव्हां हें जग सोडून जातों तेव्हां प्रेमाच्या दृष्टीनेच आवती भोंवती पहातो आणि त्याच्यावर प्रेम करणारे आप्त स्वकीय जर त्याला भेटायला आले असतील, तर सुखाने देहाला व जगाला सोडून जातो; तेव्हा अशा तऱ्हेने प्रेमशक्तीचा अनुभव असूनहि त्या शक्तीचा सामाजिक स्वरूपांत विकास करण्याची हिमत सोडून देऊन मी जर 'कायदा कायदा' असें बडबडत राहिलों, तर जनशक्ति निर्माण करून ज्या मदतीची सरकार आमच्याकडून अपेक्षा करीत आहे ती मदत मी दिली नाही असे नाही का होणार ? म्हणून दडशक्तीहून भिन्न अशी जनशक्ति मी निर्माण करू इच्छितों व तशी आपण केली पाहिजे. ही जनशक्ति दण्डशक्तीच्या विरोधी आहे असे मी म्हणत नाही, हिसाशक्तीच्या मात्र विरोधी आहे

## आमचें मुख्य काम व त्यामागील दृष्टि

आणखी एक उदाहरण देतों. आतां खादी बोर्ड बनले जात आहे. सरकार त्याला मदत देऊं इच्छितें. प. नेहरू म्हणाले जें काम चार वर्षापूर्वीच करायला पाहिजे होते तें इतक्या उशीरानें कां सुरू होत आहे ? याचें मला आश्चर्य वाटतें. ते मोठे आहेत, त्यांचें अतःकरण मोठे आहे, आत्मनिरीक्षण करतात म्हणून अशी भाषा बोलतात. सरकार खादीबोर्ड बनवू इच्छितें. खादी उत्पादन वाढवू इच्छिते. तेव्हां सरकारला या कामी मदत करावी हें आपल्या चरखा सघाचें काम आहे ; कारण चरखा सघाला या कामाचा अनुभव आहे. आणि अनुभवी माणसांची

या कामाला जरुरी आहे. तेव्हां वाटतें कीं एक नागरिक, एक माहितगार या नात्यानें सरकारला जी मदत जरूर आहे ती दिली पाहिजे. पण आम्ही त्या कामांत खतम होऊन गेलों म्हणजे आमची मूळ भूमिका सुटली, तर आमच्याकडून खादीविषयीं ज्या सेवेची अपेक्षा आहे ती घडणार नाही. आपण तर आपली दृष्टि, स्पष्ट, शुद्ध राखली पाहिजे आणि त्या दिशेने काम करीत असताना खादी उत्पत्तीमध्यें सरकारला जी मदत होईल तेवढीच दिली पाहिजे. युद्ध बद करण्याचे मार्ग शोधीत राहिले पाहिजे आणि तरीहि युद्ध चालू असले तर जखमी शिपायाना मदत करण्याचा प्रसग आलाच तर तेवढी मदत दिली पाहिजे. हा युद्धाचा भाग आहे असें म्हणून ते काम टाळावें अशी गोष्ट नाही. पण तें आपले मुख्य महत्वाचें काम नाही आपले खादी काम ग्रामराज्याच्या स्थापनेकरितां आहे ही गोष्ट दृष्टीआड होतां कामा नये.

## खादी कामांत सरकारशी सहकार्य व त्याची मर्यादा

यावेळी पं. नेहरू मला भेटण्याकरितां आले होते. फार प्रेमानें बोलले. मी त्यांचे बोलणें नम्रतापूर्वक ऐकून घेतले. आणि जेव्हां त्यांनी सल्ला विचारला, तेव्हा माझीं मतें उघडपणें त्यांना सांगितली. साक्षरतेच्या बाबतीत सरकारची जी भूमिका आहे, त्याच भूमिकेची खादी व ग्रामोद्योगाचें बाबतीत माझी सरकारकडून अपेक्षा आहे प्रत्येकाला लिहायवाचायला आलें पाहिजे; कारण ती एक नागरिकत्वाची आवश्यक खूण आहे असें आपण मानतो आणि सरकार लोकांना लिहिणें वाचणें शिकविण्याची जबाबदारी मान्य करते. सरकारकडून परिस्थि-

तीमुळें पुरा अंमल होत नाही, तरी जोपर्यंत सर्व लोकांना लिहिणे वाचणें शिकविणें साध्य झालें नाही तोंपर्यंत आपण कृत-कार्य झालों नाही ही बोंचणी सरकारच्या मनाला असतेच. त्याप्रमाणें सरकारने हिंदुस्थानातल्या प्रत्येक नागरिकाला-मग तो खेडयांतला असो, शहरांतला असो– कातायला शिकविणे आपलें काम आहे, हा विचार मान्य करावा. ज्याला कातायला येत नाहीं, त्याला अशिक्षित समजावे. एवढी खादी व ग्रामोद्योगाच्या बाबतीत सरकारकडून माझी अपेक्षा आहे. बाकीचें काम जनता पाहून घेईल. आम्ही सरकारकडून पैशाची मदत मागत नाही. हा विचार सरकारने मान्य करावा अशी अपेक्षा करितो त्यानेच खादीला अधिकात अधिक मदत दिल्यासारखे होईल असे मी त्यांना सांगितले. पंडितजींनी माझे म्हणणे ऐकून घेतलें. ते त्यांना पटलेंहि असावें. पण सहज विनोदाने त्यांनी म्हटलें 'सर्वांना कांतणें शिकविलें म्हणजे त्याच्या उपयोगाचाहि प्रश्न उपस्थित होईल.' मी उत्तर केले 'लिहिणें वाचणें शिकविल्यावर त्याच्याहि उपयोगाचा प्रश्न येतोच. मी असे कित्येक शिकलेले लोक पाहिले आहेत की, ज्यांनी दोन चार वर्षे शिक्षण घेऊनहि साऱ्या जन्मात त्या शिक्षणाचा कांही उपयोग त्यांना झालेला नाही त्यांना पांढऱ्यावर काळे अक्षर भीतिदायक वाटते. योगा बरोबर क्षेमाची जोड आहे. म्हणून उपयोगाचीहि चिंता करणें जरूर आहे पण जनतेच्या सरकारनें जनतेची एवढी मागणी पुरी केली पाहिजे.' एवढीच मी खादीच्या बाबतींत मागणी केली. ही गोष्ट आपल्या लक्षांत येईल. पण यापेक्षां पुढें जाऊन कायद्याने लोकांवर खादी लादण्याची मागणी मी केली असती तर माझे कर्तव्य मला समजलें नाहीं असें सिद्ध झालें असतें. दण्डशक्तीहून वेगळी

लोकशक्ति आम्हाला निर्माण करायची आहे, हें सूत्र मी विस- रलों असें त्यामुळें उघड झालें असतें.

## दण्डनिरपेक्षतेची निर्मिति

हीं मी दोन उदाहरणें दिली. एक भूमिदानाचें व दुसरें खादीचें आम्ही जमिनीचा प्रश्न सोडवावयास जाऊ त्याची पद्धति एका प्रकारची असेल. लोकशाही सरकार तो प्रश्न दण्डशक्तीने सोडवू इच्छित असेल, तर सरकारला मी दोष देणार नाही; पण तो मार्ग वेगळा आहे. त्यानें लक्ष्मी निर्माण होईल पण लोकशक्ति निर्माण होणार नाही. हे मला थोडक्यांत सागायचें होते पण विस्तार झाला. जर आमची दृष्टि स्थिर झाली तर आमची कार्यपद्धति कशी असेल याचें विशेष वर्णन करण्याची जरुरी राहणार नाही रचनात्मक काम करण्यातहि आमची विशेष पद्धति असावी. लोकाना दण्डशक्तीची आवश्यकता भासू नये हें त्या कार्याचें अपेक्षित ध्येय आहे.

## कार्यपद्धतीचे दोन भाग

यादृष्टीनें विचार केला तर आपल्या सहज लक्षांत येईल की, आपल्या कार्यपद्धतीचे दोन भाग आहेत. एक विचारशासन आणि दुसरा कर्तृत्वविभाजन. मला जरा शास्त्रीय शद्ब बन- विण्याची संवय आहे. आणि माझा संस्कृताचा अभ्यास विशेष असल्यामुळे ते संस्कृतच बनतात याबद्दल क्षमा असावी.

## सर्वोदय समाजाची आधारशिला

विचारशासन म्हणजे विचार स्वतः समजणें आणि दुस- ऱ्याला समजावून देणें. विचार समजल्याशिवाय कोणतीहि गोष्ट

मान्य न करणें; विचार समजल्याशिवाय कोणी आमचें म्हणणें कबूल करील तर आपल्याला दुःख झालें पाहिजे. आपली इच्छा दुसऱ्यावर लादायची नाही, तर केवळ आपला विचार समजाऊन देण्यातच आपल्याला समाधान व्हावें. आपल्या सर्वोदय-समाजाची जी रचना आहे तिला कोणी 'लूज ऑर्गनायझेशन' म्हणजे ढिली रचना म्हणतात. रचना ढिली असेल तर ती काही कामाची नाही; म्हणून रचना ढिली ठेऊन चालणार नाही. सर्वोदय समाजाची रचना ढिली नाही. ती अरचनाच आहे म्हणजे केवळ विचाराच्या आधारावरच आम्ही उभे राहू इच्छितों. लोकानी न समजता उमजता जे अमलात आणले पाहिजेत असे हुकूम आम्ही देत नाही. फक्त सल्ला-मसलत करतों. 'परस्परात सल्लामसलतीने त्याचें काम होते.' हे एक भक्ताचे वर्णन कुराणामध्ये सागितले आहे. आम्ही सल्ला देऊ. तो ऐकणाऱ्याला पटला नाही म्हणून त्याने तो मान्य केला नाही व अमलांत आणला नाही तर आम्हाला आनद वाटला पाहिजे. आणि कोणी न समजता तो अमलात आणला, तर आम्हाला दु.ख वाटलें पाहिजे. अशी जी आमची रचना आहे, तिच्यामध्ये जितकी शक्ति दिसून येते तितकी मोठ्या कुशल, स्पष्ट व अनुशासनबद्ध रचना असलेल्या सस्थेंत दिसणार नाही. अनुशासनबद्ध दडयुक्त रचनेमध्ये जी शक्ति असते ती शिवशक्ति नाही. आम्हाला ही दुसरी शक्ति मिळवायची आहे. म्हणून विचारशासनच आम्ही मानू इच्छितों.

## विचाराला प्रचाराची जोड

हे जर आमच्या लक्षात आले तर आमच्या विचाराचा निरतर प्रचार करणे हा एक आमचा कार्यक्रम होईल. तो

आम्ही अद्याप करीत नाही, पण यापुढें जोरानें केला पाहिजे. या दृष्टीनें मी जेव्हां विचार करूं लागतों, तेव्हां भगवान बुद्धांनी भिक्षुसंघ आणि शंकराचार्यांनी यतिसंघ कां बनविले असतील याचें रहस्य उलगडतें तरी देखील त्या सघासंबधी जे अनुभव आले त्यावरून त्यांच्या गुणदोषांची तुलना करून अशा सघामध्ये आपण पडता उपयोगी नाही, असाच निर्णय माझ्या मनाने दिला. सघामध्ये गुणांपेक्षा दोषच अधिक उत्पन्न होतात. म्हणून आम्ही सघ बनवणारच नाही शकराचार्यांना व बुद्धदेवाना सघ का बनवावे लागले, याचे त्या निमित्ताने स्मरण झाले एवढेच. झऱ्याप्रमाणें निरतर अखड वाहत राहणारे, नेहमी फिरणारे आणि जनतेपर्यंत पोहचून त्याना आपले विचार सतत सागणारे लोक आम्हाला पाहिजेत. त्याच्याशिवाय सर्वोदय-समाज काही काम करू शकणार नाही. लोकात मिसळण्याचे जितके प्रसग येतील, तितके प्राप्त करून घेतले पाहिजेत. एकदां सागून लोकानी ऐकले नाही तर दुसऱ्यादा सागण्याची सधि आपल्याला मिळेल म्हणून आनंद वाटला पाहिजे. इतका विचार-प्रचाराचा उत्साह, इतकी विचारावर श्रद्धा आणि निष्ठा आमच्याजवळ असली पाहिजे.

सध्यां परिस्थिती अशी आहे कीं, आमच्यांतील पुष्कळसे लोक वेगवेगळ्या सस्थांमध्ये अडकून पडले आहेत. यासंबंधी माझें म्हणणें मी मागाहून सांगेन. आतां फक्त उल्लेख मात्र करतों. या सस्था महत्वाच्या आहेत तरी त्यांची आपल्याला आसक्ति असतां कामा नये. संस्थेवर भक्ति असावी; तिचें काम चालू ठेवावें; परतु संस्थेजवळ असे कांही लोक पाहिजेत की जे

बाहेर फिरूं शकतील. अशा तऱ्हेची रचना आणि कार्यक्रम आम्ही केला नाही तर आमचा विचार कमजोर होईल आणि विचार-शासन चालणार नाही. पण आम्हांला विचाराशिवाय दुसरें कोणतेंहि शासन चालवावयाचें नाही.

## पत्रकांतून पत्रक निघतें

बिहारचे लोक कांहीशा अभिमानाने म्हणत आहेत की, भूदान-यज्ञाचें काम बिहार कॉंग्रेसने प्रथम हाती घेतलें. नंतरच हैद्राबादमध्ये अखिल भारतीय कॉंग्रेसनें त्याचा स्वीकार केला. पण काय होत आहे पहा! 'भूदानामध्ये मदत देणें कॉंग्रेसवाल्यांचें कर्तव्य आहे.' असें वरून एक सर्क्यूलर म्हणजे परिपत्रक निघतें. मग तें प्रांतिक समितीकडे येतें. तेथून जिल्हा ऑफीसमध्यें जातें. पत्रकातून पत्रक पैदा होतें. ज्याप्रमाणें गंगा हिमालयांतून उतरून हरद्वारला येते व तेथून पुढें गढमुक्तेश्वरला जाते. कोठेंहि असली तरी गंगा म्हणजे पाणीच. मी विनोदानें एकदां म्हटलें होतें की, प्रत्येक जात आपलीच जात वाढविते. त्याप्रमाणें पत्रकांपासून पत्रक निर्माण होतें. पण शेवटीं काम कोण करणार ? काम तर करावयाचें आहे खेड्यांतील लोकांमध्यें. पण तें पत्रक खेड्यांतील लोकांपर्यंत पोहोंचतें कोठें ? तें पत्रक एका ऑफीसमधून दुसऱ्या ऑफीसमध्यें व तेथून तिसऱ्या ऑफीसमध्यें गेलें एवढेंच काय तें घडून आलें. हा आमचा भूदानयज्ञाचा जो कार्यक्रम आहे तो आम्ही घरोघर पोहोंचविल्याशिवाय सिद्ध होणारा नाही. पांच लाख खेड्यांतून २५ लाख एकर जमीन मिळवावयाची आहे. काम तर सोपें दिसतें. प्रत्येक गावांतून फक्त ५ एकर मिळविणें ही कांही मोठी गोष्ट नव्हे. पण इतक्या गांवांपर्यंत कोण

पोहोंचणार ? म्हणून आमच्या जवळ विचार-प्रचाराचें जें मुख्य साधन आहे त्याची योजना करणें हा आमचा कार्यक्रम होईल.

## आमचें एक हत्यार-विचार-शासन

आमच्यांत इतक्या गांवी फिरण्याची जर हिम्मत नसेल आणि त्याऐवजी जवळचा मार्ग म्हणजे इंग्रजीमध्यें ज्याला 'शॉर्ट कट्' म्हणतात तो स्वीकारून 'कायदा करून टाकावा म्हणजे सर्व भागून जाईल' असे जर आम्ही म्हणू लागलों तर तें आमचें काम नव्हे. कायदा लवकर आणि चागला बनावा व अमलांत यावा. पण त्या कामाला आम्ही लागणे हा आमचा स्वधर्म होणार नाही; आम्ही परधर्माचें आचरण केलें असे होईल. गावोगांव फिरणे आणि विचाराच्या शक्तीवरच विश्वास ठेवणें हा आमचा स्वधर्म. विचार ऐकणे आणि ऐकविणे याने कधी काम होईल काय अशी शकासुद्धा मनात येता कामा नये. विचारानेंच काम होईल अशी आमची दृढ श्रद्धा असली पाहिजे; तेव्हां विचाराची सत्ता, विचार-शासन हे आमचें एक हत्यार आहे

## कर्तृत्व विभाजन

दुसरें हत्यार कर्तृत्व-विभाजन; म्हणजे सर्व कार्यशक्ति एकाच केंद्रांत न राहतां कर्मशक्ति व कर्मसत्ता गांवोगांव निर्माण करणें. त्याकरितां आपल्या गांवी कोणची चीज येऊं द्यावी किंवा न द्यावी याचा निर्णय करण्याचा प्रत्येक गांवाला हक्क असला पाहिजे असें आम्ही मानतों. आम्ही असें म्हटलें की, अधिकारी म्हणतात, मोठ्या सरकारामध्यें असें छोटें सरकार चालू शकणार नाही. पण माझे तर असे म्हणणें आहे की,

याप्रमाणे सत्ताविभाजन व कर्तृत्वाचें विभाजन आम्ही केलें नाही तर सैन्याशिवाय आमचे राज्ययंत्र चालणार नाही हे खुशाल समजा आज तर सैन्याशिवाय चालत नाही, पण पुढेहि कधी चालणार नाही. मग एकदाच कायमचा निर्णय करून टाका की, सैन्यबलानेच राज्य चालवावयाचे आहे आणि सैन्य सुसज्ज राखावयाचें आहे. सैन्य बाळगण्याच्या खटाटोपासून आम्ही मुक्त होऊ इच्छितों, असली भाषा मग कधी बोलू नका. सैन्यापासून सुटका पाहिजे असेल तर परमेश्वराने जे केले आहे तेच आपणहि केले पाहिजे परमेश्वराने सर्वांना अक्कल दिली आहे. विचवाला दिली आहे, सापाला, वाघाला व मनुष्यालाहि दिली आहे. थोडी कमी जास्त असेल, पण प्रत्येकाला अक्कल दिली आणि सागितले "आपल्या अकलेच्या आधारावरच आपले जीवन चालवा." तेव्हापासून सारी दुनिया इतकी उत्तम चालू लागली की, तो विश्राति घेत दूर राहिला आहे; इतका की परमेश्वर आहे की नाही अशी शंका लोकाना येऊ लागली आहे ! त्याप्रमाणेच वरती कोणी शासनसंस्था आहे की नाही अशी शका यावी, अशा प्रकारेच आम्हाला राज्य चालवावयाचें आहे हिंदुस्थानामध्ये मुळी राज्यसत्ताच नाही असे जेव्हा लोक म्हणूं लागतील, तेव्हा आमचें राज्यशासन अहिंसक होईल. म्हणून आम्ही ग्रामराज्याचा उद्घोष करतों आणि गावाला नियंत्रणाची सत्ता असावी अशी मागणी करतों. अर्थात् गांववाल्यांनीं नियंत्रणाची सत्ता आपल्या हाती घेतली पाहिजे. हेंहि एक जनशक्तीचें उदाहरण आहे. गाववाल्यांनी आपल्या पायावर उभे राहून अमुक वस्तु आम्ही स्वत: बनविणार आहों असा निर्णय करावा आणि सरकारकडे मागणी करावी की, अमुक

वस्तु आमच्याकडे येणं उपयोगी नाही, ती बंद करा. सरकारनें जर तशी बंदी घातली नाही किंवा समजा बंदी घालण्याची इच्छा असूनहि तें बंदी घालू शकलें नाहीं तर लोकांनीं सरकारच्या विरुद्ध उभे राहण्याची हिम्मत धरली पाहिजे. त्यामुळेंच सरकारला मोठी मदत केल्यासारखें होईल. अशा कर्तृत्वविभाजनाशिवाय सैन्यबलातून सुटका होऊं शकत नाहीं. दिल्लीमध्येंच केवळ अक्कल पैदा होते असें नाहीं. चार तोंडें असल्यामुळें ज्याला चारी दिशांकडे पाहता येते असा ब्रह्मदेव असला तरी तो दिल्लीत बसून प्रत्येक गांवाचें नियंत्रण आणि नियोजनहि करूं शकणार नाहीं.

## ‘नॅशनल प्लॅनिंग’ ऐवजी ‘व्हिलेज प्लॅनिंग’

नॅशनल प्लॅनिंगच्या ऐवजी व्हिलेज प्लॅनिंग झालें पाहिजे. मी ‘ऐवजी’ असें म्हटलें खरें. खरोखर म्हटलें म्हणजे व्हिलेज प्लॅनिंग ( ग्रामीणनियोजन ) याचा अर्थच नॅशनल प्लॅनिंग (राष्ट्रीयनियोजन) आणि अशा व्हिलेज प्लॅनिंगला जी कांहीं मदत द्यावी लागेल, तेवढी दिल्लीहून दिली जावी हा आमच्या कार्यक्रमाचा दुसरा भाग.

आम्ही जें कांहीं करीत आहोंत तें सारें आमचें कार्य या दिशेने चाललें आहे. म्हणूनच आम्ही गांवामध्यें जमिनीचें विभाजन करूं इच्छितों. जमिनीसंबंधी जेव्हां प्रश्न निघतो तेव्हां म्हणतात कीं कांहीं ‘सीलिंग’ म्हणजे कमाल मर्यादा ठरवा. म्हणजे अधिकांत अधिक किती जमीन एका जवळ असावी याचा विचार करा. भूदान–यज्ञाचें आंदोलनाला जोर लागल्यापासून आणि जनतेमध्यें एक भावना निर्माण झाल्यापासून एवढी गोष्ट तरी

लोक बोलूं लागले आहेत ! पण मी म्हणतो की, प्रथम कमीत कमी किती जमीन प्रत्येकाला दिली पाहिजे हें आधीं ठरवा. कारण मी कर्तृत्व-विभाजन करूं इच्छितों. आज सारे मजूर दुसऱ्याच्या हाताखाली काम करीत आहेत. ते काम तर करीत आहेत पण त्यांच्यामध्ये कर्तृत्व नाही. गाडी चालली आहे; त्या गाडीला आपण कांही कर्ता मानीत नाही; कारण ती चेतनविहीन आहे. आज जे मजूर शेतांत काम करीत आहेत तेहि चेतनविहीन काम करीत आहेत. हाताने, पायानें काम करतात. पण बुद्धीनें आणि अंत.करणाने त्यांचें काम व्हावें असें आम्ही इच्छितों.

हिंदुस्थानातील मजुरांमध्यें तितकी अक्कल नाही म्हणून त्यांना दुसऱ्याच्या हाताखाली राहण्याशिवाय गत्यंतर नाही असें जर कोणी म्हटलें तर त्याला माझें उत्तर असें की, दुसऱ्याच्या हाताखाली काम करावें लागणें हा अहिंसेचा मार्ग नाही. त्यांच्या जवळ जी अक्कल आहे तीच आमची खरी पुंजी आहे.

## अपार बुद्धिमत्ता सत्कारणीं लाविली पाहिजे

भांडवलवाल्यांची अक्कल मजुरांच्या अकलेपेक्षां जास्त आहे असें क्षणभर समजा. परतु सर्व देशांतल्या श्रम करणाऱ्या लोकांची जी अक्कल आहे त्या अकलेची बरोबरी दुसरी कोणचीहि अक्कल करूं शकत नाही. आम्ही या 'श्रमिकाच्या अपार अकलेचा जर उपयोग करणार नाही तर आपल्या देशाचें मोठें दुर्भाग्य आहे. मजुरांची जी काही अक्कल आज आहे तिचा पुरा उपयोग करणें आणि त्या बरोबरच त्यांची अक्कल वाढावी अशी योजना करणें जरूर आहे आणि अशी त्यांची

अक्कल वाढविण्याच्या योजनेचा एक भाग म्हणूनच त्यान जमीन दिली जावी. त्या शिवाय त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था केली जावी शिक्षणाचा एक भाग म्हणून त्याना जमीन देणें हेंहि त्याची अक्कल वाढविण्याचें एक साधन आहे.

## कार्य रचना : (१) सर्वोदय–समाज

आता मी कार्यरचनेकडे वळतो. त्या सबधी माझा थोडासा विचार सांगतो. रचनेमध्ये आम्ही एक '**सर्व-सेवा-संघ**' मानला आहे आणि दुसरा '**सर्वोदय-समाज**.' सर्वोदय समाजाचें नाव चालेल व 'सर्व सेवा सघ' काम करील याप्रमाणें एकाचें नांव व दुसऱ्याचें काम. दोन्ही मिळून आमचें काम चालेल. 'सर्व सेवा सघ' ही नियमबद्ध संस्था आहे. आणि सर्वोदय-समाजाची रचना ढिली किंवा मजबूत यापैकी कसलीच नाही ती अरचना आहे. विचाराची सत्ता मान्य करणारें तें मडळ आहे. सर्वोदय समाज हुकूम कशा तऱ्हेनें मान्य करील याचा विचार करण्याची आम्हाला जरुरी नाही. कारण केवळ हुकूम मानणारा समाज आम्हाला बनवावयाचा नाही. तर तो विचारवान कसा होईल, विचाराची सत्ता त्यावर कशी चालेल या दिशेने आपण काम केलें पाहिजे जेवढे सर्वोदयसमाजाचे सेवक या ठिकाणी जमले आहेत, ज्यांनी आपलें नाव दिले आहे ते व ज्यांनी आपलें नाव दिलेलें नाही व जे येथे आलेलेहि नाहीत त्याच्यामध्यें एकच सुसगत विचार निर्माण व्हावा असें काम आपण केलें पाहिजे. याकरितां मी एक गोष्ट सुचविली आहे की, कार्यकर्त्यांनी सामान्य लोकात जाऊन विचाराचा प्रचार करण्यासाठी फिरले पाहिजे. दुसरी गोष्ट साहित्याचा प्रचार झाला पाहिजे. त्याचें चितन, मनन झालें

पाहिजे. आमच्या विचाराची दुसऱ्या विचाराशीं तुलना करून त्याचा अभ्यास करणारे वर्ग ठिकठिकाणी चालले पाहिजेत. अशी योजना सर्वोदय ममाजाकरिता करणें जरूर आहे

## कार्यरचना : (२) सर्व-सेवा-संघ

'सर्व-सेवा-सघ' मात्र एकजिनसी मजबूत सस्था असली पाहिजे. इच्छा असूनहि या दृष्टीने आम्ही विशेष करू शकलों नाही ही गोष्ट मला कबूल केली पाहिजे; पण आम्ही जर हें केले नाहीं तर जनतेच्या आपल्या सबंधी ज्या अपेक्षा आहेत त्या आपण पुऱ्या करू शकणार नाही जुन्या पद्धतीनेच वेग-वेगळचा सस्था अलग अलग काम करीत राहिल्या तर त्यांतून शक्ति निर्माण होणार नाही. त्यासाठी एक उदाहरण देतों. तसें करण्यात एखाद्या सस्थेचा मी उल्लेख केला तर तिचे दोष दाखविण्याकरिता मी बोलत नाही, मी दोष आपलेच सागत आहे आणि ते परक्या लोकापुढे नाही, तर आपल्याच लोका-पुढे दाखवीत आहे. आपली हिंदुस्थानी-प्रचार-समिति आहे; त्या ठिकाणी काय चाललें आहे? विद्यार्थी येतात. पूर्वीपेक्षा आता कमी येत असावेत; कारण तेथे नागरी आणि उर्दू दोन्ही लिप्या शिकाव्या लागतात त्याला आज अनुकूल वातावरण नाही. परंतु तरीहि जे विद्यार्थी आज तेथे शिकावयास येतात ते दोन्ही लिप्या, दोन्ही भाषा शिकणे आपले कर्तव्य समजतात. परतु आपला समाज एकजिनसी करावयाचा असेल, तर हिंदु-स्थानी प्रचार सभेच्या शिक्षणाकरितां जे लोक येतात त्यानाहि मी चार तास शेतीचें काम देईन. त्यानतर एखादा तास कता-ईचें काम देईन मग एखादा तास स्वयपाक वगैरे काम देईन

नंतर तीन चार तास उर्दू किंवा हिंदी जें कांहीं त्यांना शिकाव-याचें असेल तें ते शिकतील. पण आजच्या प्रमाणें शिक्षण चाललें तर शक्ति निर्माण होण्याचा मुळींच संभव नाही. काही विद्या-र्थ्यांनी एकत्र जमून उर्दू आणि नागरी दोन्ही लिप्या शिकल्या म्हणजे त्यामुळें देशाची ताकद वाढली असें होऊं शकत नाही. मी आतां बोलत आहे; तुम्ही ऐकत आहात. जर तुमचा कान कापून ऐकण्याकरितां या टेबलावर ठेवला व माझी जीभ कापून त्या ठिकाणी बोलण्याकरितां ठेवली तर मी बोलूहि शकणार नाही व आपण ऐकूहि शकणार नाहीं. मी पूर्ण आहे तोंवर बोलू शकतों व आपणहि पूर्ण आहांत तोंवर ऐकू शकता. जरी मी बोलण्याचें काम करीत आहे व आपण ऐकण्याचें काम करीत आहात, ही आपण वेगळी वेगळी कामें करीत आहोंत तरी आपण पूर्ण आहोंत म्हणूनच ती होऊं शकतात. हिंदुस्थानी-प्रचार-सभे-मध्यें मुख्य काम चार तास उर्दू-नागरी लिप्या शिकण्याचें राहील. तरीहि बाकीच्या सर्व जीवनांत आमच्या पूर्ण जीवनाचा अंश दाखल केला पाहिजे. तरच त्या उर्दूमध्यें ताकद येईल व त्या नागरीमध्यें ताकद येईल. या उदाहरणासारखी मी आणखी कितीतरी उदाहरणें देऊं शकेन.

## तुटक तुटक कामामुळें शक्ति निर्माण होत नाहीं.

आपण लोक तुटक तुटक काम करीत आहोंत. त्यामुळे त्यांत शक्ति निर्माण होऊं शकत नाहीं. समाजामध्यें क्रांति झाली पाहिजे अशी आम्ही आशा बाळगतों. परंतु जोंपर्यंत आमच्या संस्था तुटक तुटक काम करीत आहेत तोंपर्यंत ती आशा सफल होणार नाही. आमच्या संस्था चांगलेंच काम करीत आहेत,

परतु त्यांना असा मोह वाटत आहे की, आम्ही विशिष्ट काम करीत आहोंत, त्याकरितां विशिष्ट विचार करू शकतों. आम्ही एक झालों तर तो विशिष्ट विचार कमी होऊन जाओल. अनेक विषयांकडे लक्ष दिल्यामुळें आम्हाला आमच्या विषयाकडे एकाग्रतेनें पहावयास मिळणार नाही, असा आपण अदाज करतों. प्रत्येक योजनेमध्यें कांही विशिष्टता असते. काही उणीवा असतात ही गोष्ट मी मान्य करीन; पण त्या सर्वाचा विचार करून पाहिलें तर 'सर्व-सेवा-सघ' एकजिनसी बनविल्याशिवाय शक्तीचें दर्शन होणार नाही, हें आपल्या लक्षांत येईल. कार्यरचनेसबंधी माझे म्हणणे मी सागितलें. अखेरीस आम्ही जी दोन-तीन कामे हाती घेतली आहेत त्या विषयी थोडेसे सांगून मी समाप्त करतो.

## आमचीं अंगीकृत कार्यें : (१) भूदान-यज्ञ

एक भूमिदान यज्ञाचें काम आम्ही सुरूं केलें. त्यासंबधीं माझ्या मनात जे विचार येतात तेंच माझ्या मुखांतून निघतात. कमीतकमी पांच कोट एकर जमिनीची उलाढाल झाली पाहिजे. भूमिवानाकडून भूमिहीनाला इतकी जमीन मिळाली पाहिजे आणि हें काम १९५७ च्या पूर्वी पुरें झालें पाहिजे. आपण जर सर्व म्हणजे केवळ सर्वोदय-समाजाचे लोकच नाही तर कॉंग्रेसवाले, प्रजासमाजवादी इत्यादि जे कोणी लोक हा विचार मान्य करतात ते सर्व या कामाला लागलों, तर हा प्रश्न आपणास कायद्याशिवाय सोडविण्यांत सोळा आणे यश मिळाले नाही तरी बारा आणे निदान आठ आणे तरी यश मिळेल व उरलेल्याची पूर्तता कायद्यानें होऊन जाईल. मी कोणी ज्योतिषी नाही. काय

होईल, कशा प्रकारें होईल, याचें मी भविष्य करूं शकत नाहीं. प्रधानतया लोकशक्तीनें हें व्हावें ही माझी इच्छा. केवळ जनशक्तीनेंच हें काम पूर्ण झाले तर मी आनंदाने नाचू लागेन. पण सर्वस्वी नाही तरी बहुतांशी जनशक्तीनेंच तें घडलें तरी मी संतोष मानीन. १९५७ पूर्वी जर हें काम आपण करूं शकलों तर नतर जी सार्वत्रिक निवडणूक होईल ती सज्जन लोक असलेल्या दोन पक्षांमध्ये होणार नाही. आज स्थिती अशी आहे की, या पक्षांतहि सज्जन लोक आहेत व दुसऱ्या पक्षांतहि आहेत, आणि भीष्म व अर्जुन यांचें युद्ध चाललें आहे. आम्हाला भीष्मार्जुन युद्ध नको आहे. राम-रावण युद्ध पाहिजे आहे. दोन्ही पक्षांमधील सज्जन एकत्र कां होऊं नयेत? ज्यांत ते एकदिलाने काम करूं शकतील असा जर कार्यक्रम त्यांना मिळेल तर दुसरे किरकोळ मतभेद ताबडतोब मिटून जातील समाजवादी म्हणतात, 'तुम्ही हा आमचाच कार्यक्रम हाती घेतला.' मी त्यांना म्हणतों की, मला कबूल आहे व म्हणूनच तुम्ही मला मदत द्या. कॉंग्रेसवाले म्हणतात, 'हा तर कार्यक्रम फार चागला आहे. आम्हांला तो करावयाचाच होता!' तेव्हां मी त्यांच्याकडूनहि मदत मागतों. जनसंघवाले म्हणतात की, 'तुमचा कार्यक्रम भारतीय सस्कृतीला अनुकूल आहे. म्हणून चांगला आहे.' त्यावरून मी समजतो की भिन्न भिन्न पक्षांच्या लोकांना हा कार्यक्रम पसंत आहे. तेव्हां आम्ही जर या कामाला लागलों तर नव्या निवडणुकांमध्यें वेगवेगळ्या पक्षांमधील मतभेद उरणार नाहींत. चांगले लोकच निवडून येतील, आणि त्यामुळें नवे सरकार फार मजबूत होईल. या भूमिदानाच्या कार्यामुळें अशी मला आशा वाटत आहे. पांच कोट एकर जमीन मिळविल्या-

शिवाय आम्हाला समाधान होणार नाही, आणि येत्या वर्षात २५ लाख एकराचा संकल्प पुरा झालाच पाहिजे.

## (२) संपत्तिदान-यज्ञ

या बरोबरच सपत्तिदान-यज्ञ नावाचा दुसरा कार्यक्रम मी सुरू केला आहे. त्याच्याशिवाय भूमिदान-यज्ञाची पूर्तता होणार नाही. आर्थिक-स्वातत्र्य, आणि आर्थिक-समता हीहि त्याशिवाय साधणार नाहीत सुरवातीलाच ही गोष्ट माझ्या लक्षात आली होती परतु 'एक साधे सब सधे' ही म्हण लक्षात घेऊन आणि दोन गोष्टी एकदम चालू करणे अवघड आणि सपत्तिपेक्षां जमिनीचा प्रश्न मूलग्राही आहे म्हणून तेलगणात परमेश्वराच्या साक्षात्कारामुळे जमिनीचा प्रश्न प्रथम हाती घेणे मला बरें वाटले. म्हणून आरंभ फक्त भूमिदानयज्ञाचाच केला; पण पुढें बिहारच्या भूमिदानाचा प्रश्न सपत्तिदानाशिवाय पुरा होणार नाही असें आढळलें, तेव्हा मी सपत्तिदान यज्ञाला सुरवात केली. सपत्तिदानावर मी पुष्कळ लिहिलें आहे, बोललों आहे व चर्चाहि केली आहे. तेव्हां येथे विस्ताराची जरुरी नाही. येथें एवढे मात्र सांगितलें पाहिजे की, आम्ही संपत्ति आमचे हातात एकत्र करणार नाही. त्यांतहि कर्तृत्वविभाजनच आम्ही इच्छितों. म्हणजे जो संपत्ति देईल तो ती आपल्या जवळच ठेवील. तिचा उपयोग मात्र तो आमच्या निर्देशाप्रमाणें करील अशी आमची योजना आहे. भूमिदानयज्ञाप्रमाणें गांवोगांव फिरून, प्रचार करून, सामुदायिक रीतीनें मात्र संपत्तिदानयज्ञाचा व्यापक प्रचार करण्याचा इरादा नाहीं. व्यक्तीशीं आणि त्यांच्या कुटुंबाशी प्रेमानें बोलून त्यांच्या अंत:करणांत प्रवेश करूनच हे काम करावयाचें

आहे. आजपर्यंत ज्यांनीं असें संपत्तिदान दिलें आहे त्यानीं तें दर-वर्षी आमरण द्यावयाचें आहे. त्यांच्यांशी बोलून त्यांची परीक्षा करूनच त्यांचें दान मी स्वीकारलें आहे. दान देण्याला उत्तेजन देण्याऐवजी मी त्यांच्यावर कांही नियंत्रणहि घातलें. आतापर्यंत सुमारें ४०।४५ लोकांनीं आपली नांवें दिलीं आहेत या विषयांची जास्त चर्चा मी येथें करीत नाहीं, पण ज्यांच्याजवळ कांही गठडी आहे त्यांनी ती सोडून या संपत्तिदानांत भाग घ्यावा आणि आपल्या स्नेह्यां-सोबत्यांमध्यें त्याचा प्रचार करावा एव-ढेंच मी येथें सांगतों. भूमिदान आणि संपत्तिदान ही दोन्हीं कामे एकमेकास पूरक आहेत. पंचवीस लाख एकर जमीन मिळविण्याच आमचा संकल्प आहे. त्याच्यावर पुरा जोर द्यावयाचा आहे. संपत्तिदानाचें काम सार्वजनिक प्रमाणांत चालवावयाचें नाही व्यक्तिगत करावयाचें.

## (३) सूतांजलि

या दोन कामाशिवाय तिसरें सूतांजलीचें काम आहे. ह्या कामामध्यें फार मोठी शक्ति आहे. मात्र तिचें अद्याप आपल्याला आकलन झालेलें नाहीं. शरीरश्रमाला प्रतिष्ठा देणें आणि देशाची लक्ष्मी वाढविणें या दोन गोष्टीवर नजर ठेवून गाधी-जींच्या स्मृतिदिवशीं सुताची एक गुंडी अर्पण करावयाची आहे ही गुंडी देणारा सर्वोदयाचा मतदार होतो असें मी मानलें आहे. हें मोठें काम आहे. त्याकरितां घरोघर गेलें पाहिजे. गांवोगाव फिरलें पाहिजे. एवढीच काय ती अडचण आहे. पण मी ती अडचण मानीत नाही. आमच्या कामाला तें एक प्रोत्साहनच आहे असें समजतों. या निमित्तानें घरोघर जाण्याची सधि

आपणास मिळेल. हें काम आपणाला वाढवावयाचें आहे. ज्याप्रमाणे २५ लाख एकर जमीन मिळविण्याचा आपण संकल्प करीत आहों, त्याप्रमाणें लाखो गुंड्या सूतांजली मिळविण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे. श्रमाची प्रतिष्ठा वाढविण्यांत त्याचा पुष्कळ उपयोग होणार आहे.

## कांचनमुक्ति

आणखी एक गोष्ट त्याच्यातून निष्पन्न होणार आहे, ती मी आपल्यास सागतों. आजपर्यंत आपण पैशाच्या आधारावर संस्था चालविल्या पैसे देणारे लोक आमचे स्नेही होते; आमच्यावर प्रेम आणि सहानुभूति राखणारे होते. आणि ते शुद्ध हृदयानें आम्हाला साहाय्य करीत होते तें साहाय्य घेण्यात आम्ही चूक केली असें नाही. पण आतां काळ बदलला आहे. नवा काळ श्रमिकांचा आहे. श्रमाची प्रतिष्ठा आपण वाढविली पाहिजे. म्हणून प्रत्येक प्रातामध्ये श्रमाच्या आधारावर चालणारी एखादी तरी संस्था आपण स्थापन केली पाहिजे. मदत घ्यावयाची झाली तर ती श्रमदानाचीच घ्यावयाची; पैशाची नव्हे ! सूताजलीचा जर पुष्कळ प्रसार झाला तर अशा सस्था आपण चालवू शकू. त्यांतून तेजस्वी कार्यकर्ते निर्माण होतील, ते प्रचारहि करू शकतील आणि कामहि करूं शकतील. ही आमची तिसरी योजना.

बंधू हो ! माझे विचार थोडक्यांत आपणापुढे मांडले आहेत. सर्वोदय-समाजाच्या सभेला आपण येतों तेव्हा जीवनाच्या कित्येक गोष्टीवर विचार व चर्चा करावी लागते. ती आपण करावीच. परतु मी ज्या मुख्य मुख्य गोष्टी आपणापुढें मांडल्या, यांचा आपण विचार करा, चिंतन करा, मनन करा; आणि या

कामाकरितां पुढील एक वर्ष तरी द्या अशी मी इच्छा करतों.

## आमचा सांप्रदाय नाहीं–पंथ नाहीं !

शेवटी दोन शब्द सांगावयाचे. आपलें काम सांप्रदायिक नाही. सर्वोदयवाले हा शब्दहि ऐकावयाला येऊ नये. आम्ही केवळ मनुष्य आहोंत. मानवाहून आम्ही कोणी वेगळे नाही ही दक्षता आपण घेतली पाहिजे; नाहीतर सर्वोदय-समाजाला घटना, अनुशासन बनविलें नसलें तरीहि आपण सांप्रदायिक बनून जाऊ ! तसें बनलों की, आपण इतर लोकांपासून वेगळे पडू. तेव्हा अमुक माणूस समाजवादी आहे, अमुक कॉग्रेसवाला आहे, अमुक सर्वोदयवादी आहे अशी भाषाहि आपलें तोंडून निघता कामा नये. दुसरे लोक आपल्या पक्षाच्या नांवावर काम करोत किंवा आपल्या पक्षाची उपयोगिता समजोत. पण आमचा मात्र कोणचाहि पक्ष नाही. जिला तिसरी शक्ति म्हणतात ती आम्ही आहोंत. हिंसाशक्तीच्या विरोधी पण दंडशक्तीहून भिन्न अशी ही आमची तिसरी शक्ति आहे. ही शक्ति व्यापक करण्याकरितां आपण लोकांत मिसळावयाचें आहे; पण सांप्रदाय बनवावयाचा नाही, केवळ मानव म्हणूनच काम करावयाचें आहे.

बधूनो ! माझे हे लांबलेलें व्याख्यान आपण शांततेनें ऐकून घेतलेत, याबद्दल मी आपला आभारी आहे. आपणास प्रणाम करून मी माझें भाषण संपवितों.

❀

# प्रवचन दुसरें

आज तीन विषयांवर मी आपल्या समोर बोलण्याचें योजिलें आहे. सर्वोदय-समाज-सेवकांचा सरकारी योजनांशी आणि भिन्न राजकीय पक्षांशी कसा संबंध असावा हा एक विषय. भूदान यज्ञाचें काम पुढे वाढविण्यासाठी काय योजना करावी हा दुसरा. आणि अंत:परीक्षण करून आपल्यामध्ये ज्या उणीवा व दोष आहेत त्याची चर्चा करून ते दोष कसें निवारण करावेत हा तिसरा. हा विषय थोडा गहन आहे म्हणून त्यासंबधी चर्चा मी संध्याकाळच्या व्याख्यानात करीन. आतां पहिल्या दोन विषयांसंबधी बोलतों.

## मुक्त-ज्ञान-प्रचार

भूदान-यज्ञाविषयी बोलतांना त्याला प्रेरणा देण्यापुरतेंच बोलण्यांत मी संतोष मानीत नाही. तर जिला सर्वोदय-विचार म्हणतात, जीमध्यें जीवनाची स्वयपूर्ण व विधायक दृष्टि आहे तिचीहि चर्चा करण्याचा माझा रिवाज आहे; आणि त्यासंबधो जे अनेक विषय उत्पन्न होतात त्यांचीहि मी चर्चा करतो. कित्येक वेळां असे होतें की साऱ्या व्याख्यानांत भूदान-यज्ञासबधी फारच थोडें बोलणें होतें. त्याच्या भोंवतीच्या इतर विषयासबंधी मी अधिक बोलतों. कित्येक वेळी आक्षेपक काही प्रश्न विचारतात, त्याचीहि उत्तरें मी देतों. अशा प्रकारें ज्याला मुक्तज्ञान-प्रचार म्हणतात तो मी करीत असतों. एखाद्या विशेष गोष्टीवर नजर ठेवून विचार करण्याऐवजी मला मुक्त चिंतन अधिक साधते. तरी पण मी एक काम हाती घेऊन तें करीत आहे ही

गोष्ट मी विसरत नाहीं, म्हणून विषयाला आणि चिंतनाला काही मर्यादा घालावी लागली तरी असें मर्यादित चितन करण्याचा माझा स्वभाव नाही हें उघड आहे.

## एक प्रश्न

कम्यूनिटी प्रॉजेक्ट, नॅशनल प्लॅनिंग ही योजना आणि वेगवेगळ्या पक्षाचे खास सिद्धांत किंवा आयडिऑलजी अशा अनेक विषयावर माझें मत विचारलें जाते आणि मी त्याला उत्तर देतों. अशी उत्तरे देण्यांत वेगवेगळ्या पक्षांच्या आणि सरकारच्या ज्या योजना आहेत त्यामध्ये अधिकांत अधिक कसे सहकार्य देता येईल हें पाहण्याची माझी दृष्टि असते. एका मित्राना ही गोष्ट आवडली नाही. आमचे विचार दुसऱ्या पक्षाहून आणि सरकारच्या विचाराहून कसे वेगळे आहेत, कोठे विरोधी आहेत ही गोष्ट अधिक स्पष्ट झाली पाहिजे. असा आक्षेप किंवा प्रश्न एका सर्वोदयप्रेमी मित्राने विचारला आहे त्याच्या प्रश्नाला उत्तर म्हणून माझ्या चिंतनामागें जी दृष्टि आहे ती मी या सर्वोदयसम्मेलनापुढें मांडणार आहे

## सरकारी योजनेतल्या चांगल्या अंशाला मदत

प्रथम सरकारी योजनेकडे वळू. ही योजना करणाऱ्याच्या आणि आमच्या ध्येयामध्येंच फरक आहे; हा आमचा त्या योजनेवर मुख्य आक्षेप आहे या एका आक्षेपाच्या पोटांत इतर सारे येऊन जातात. या मुख्य गोष्टीचें विश्लेषण जितक्या स्पष्टपणें करणें शक्य होतें तितकें मी प्लॅनिंग कमिशनपुढें केलें; आणि त्यांनीहि माझे विचार समजावून घेण्याचा प्रयत्न केला. प्लॅनिंग

कमिशनचा जो नवा रिपोर्ट बाहेर पडला आहे आणि जो अखे-रचा नाही व त्यांत अजून सुधारणा होण्याच्या आहेत असें ते म्हणतात. त्या रिपोर्टांत पहिल्या रिपोर्टाशी तुलना करता पुष्कळ सुधारणा झाली आहे परंतु जेव्हा ध्येयामध्येच फरक असतो तेव्हां योजनेमध्येहि फरक राहणारच ! त्याचा मी पुनरुच्चार करीत नाही. कोणी प्रश्न विचारला तेवढ्यापुरते माझे हे उत्तर आहे साधारणत. सरकारी योजनेशी माझी सहानुभूति आहे असे दिसते ही गोष्ट खरी आहे. कारण निष्कारण बुद्धि-भेद करून ते काम बिघडवून टाकण्याची माझी इच्छा नाही. सरकारी योजनाविरुद्ध चळवळ करून ती अयशस्वी कराव-याची असेल तर ती आम्ही करू शकू, तेवढी शक्ति आमच्यात आज आहे. पण ही काही मोठी शक्ति नव्हे. आमची योजना लोकापुढे माडून त्याच्याकडून त्यावर अम्मल करण्याची किंवा आमचा कार्यक्रम लोकापुढे ठेवून आम्ही निवडून यावें आणि आम्हाला पाहिजे तसे सरकार बनवावें एवढी शक्ति आम-च्यांत नाही. तेव्हां आमच्यामध्ये जी बिघडवून टाकण्याची शक्ति आहे तिचा उपयोग करून, लोकामध्ये अश्रद्धा व बुद्धिभेद उत्पन्न करून, त्या योजनांमध्ये जो चागला भाग आहे तोहि अमलांत न येऊ देणें हे अहिंसेच्या दृष्टीने मी योग्य मानीत नाही. दडशक्ती-वर आधारलेलें सरकार चालू परिस्थितीच्या फार पुढें जाऊ शकत नाही. त्यानी केलेली योजना आमच्या योजनेशी विशेष अनुकूल असणार नाही, तरीहि त्यामध्यें जो चांगला भाग आहे त्याच्याशी सहानुभूति दाखविणे आणि तेवढ्यापुरती जनतेची श्रद्धा रहावी असा प्रयत्न करणे हें मी माझे, अहिंसक विचारक या नात्याने, एक कर्तव्य समजतों. आज लोकांत विशेष उत्साह

नाहीं, आळस आहे, अविश्वास आहे, तेव्हां त्यांच्यापुढें जी योजना आहे, तिचें आम्ही खडन करीत बसलों तर लोक त्या योजनेचा अम्मल करणार नाहीत. पण त्यामुळें आपला काय लाभ ? आम्ही आमची योजना करूं शकत असलों तर गोष्ट वेगळी म्हणून सरकारी योजनेंत जो कांही चागला भाग आहे त्यापुरती आम्ही आमची सहानुभूति दाखवीत जावें आणि त्या बरोबर आमची स्वतःची योजना लोकांपुढें ठेवीत जावें हे मी योग्य समजतो.

## दुसऱ्याच्याहि नीतीवर विश्वास ठेवा

दुसरी गोष्ट अशी आहे की, जेव्हां आम्ही एखाद्या गोष्टीचें खंडन करूं लागतों तेव्हा प्रतिपक्षाच्या नीतीवरच आक्षेप घेतों हे अन्यायाचें आहे मी जेव्हां त्याच्या नीतीवर आक्षेप घेतों तेव्हां माझ्या नीतीवरहि आक्षेप घेण्याचा अधिकार मी त्याला देऊन टाकतो. अशा तऱ्हेचा अधिकार देणे माझ्या हिताचे नाही. त्याच्या नीतीवर माझा विश्वास असावा आणि माझ्या नीतीवर त्याचा विश्वास असावा.

## भांडवलशाही आणि सर्वोदय विचार

आजच्या सरकारावर भाडवलवाल्यांचें वजन बरेच आहे, हें मी जाणतों व केव्हा बोलूनहि दाखवितो. परतु सरकारला भांडवलशाही पाहिजे आहे म्हणून नव्हे तर सध्याच्या परिस्थितीमध्ये भांडवलवाल्याची शक्ति व अक्कल यांचा उपयोग केला पाहिजे असें ते निरुपायाने समजतात. त्याचे विचारहि कांहीसे भांडवलवादास अनुकूल आहेत. ही गोष्ट आताच्या सरकारचीच नाही, कम्युनिस्ट लोकांविषयीहि मी हेच म्हणू शकेन.

आमच्या योजनेमध्यें विकेंद्रीकरण आहे पण कम्युनिस्टांना उत्पादनामध्यें विकेंद्रीकरण नको आहे. जे आपल्याला 'लेफ्टिस्ट' म्हणजे प्रगतिवादी मानतात त्याच्यामध्यें आणि भांडवलवाल्यांमध्ये मोठ-मोठ्या यंत्रांच्या सहाय्याने केंद्रित उत्पादन करण्याचें बाबतीत विशेष फरक नाही. वाटणीमध्ये फरक आहे. आम्हाला संपत्तीच्या उत्पादनात आणि वाटणीतहि विकेंद्रीकरण पाहिजे आहे. हा आमच्यात आणि आतांचें सरकार व कम्युनिस्ट लोक याच्यामधील मुख्य फरक आहे. ज्या परिस्थितीमध्ये ते सध्या आहेत व ज्या विचाराचा त्याच्यावर पगडा आहे, तसाच जर आमच्यावर असता तर सध्याचे सरकार जे करीत आहे, जवळ जवळ तसेंच आम्ही केले असते. सरकारच्या कामाकडे पाहण्याची माझी ही दृष्टि आहे.

## कम्यूनिटी प्रॉजेक्ट संबंधी सर्वोदयवाल्यांची दृष्टि

पण परवाच्या व्याख्यानांत सांगितल्याप्रमाणें आमच्यापुढे एक निश्चित मार्ग आहे आणि आपण त्या मार्गानेंच गेलें पाहिजे. सरकारी योजनांमध्यें आम्ही कितपत भाग घ्यावा या विषयी लोक मला विचारतात. त्यांना माझे असें सांगणें आहे की, त्या योजनेतला जेवढा भाग आपल्याला मान्य असेल तेवढ्यापुरतें सहकार्य द्यावें, पण केव्हाहि आपण त्यात अडकून पडतां उपयोगी नाहीं. एखाद्या कम्यूनिटी प्रॉजेक्टची जबाबदारी घेतली आहे व त्यांत आपले हात अडकून पडले आहेत, अशी स्थिति असता उपयोगी नाही. त्यानी काही सल्ला विचारला तर तो द्यावा. काही नैमित्तिक मदत मागितली तर ती द्यावी पण सर्व योजनेची जबाबदारी आम्ही घेऊ लागलों तर माझ्या मते ती चूक

आहे. आपला सर्वोदय-समाज एक मुक्त समाज आहे प्रत्येक माणूस स्वतः विचार करून त्याप्रमाणे वागू शकतो, त्यामुळे कित्येक सेवक कम्यूनिटी प्रॉजेक्ट एकदरीत चागला आहे असे समजून त्यात भाग घेत आहेत तर दुसरे कांहीं सेवक कम्यूनिटी प्रॉजेक्ट देशाचा नाश करणार आहे, असें म्हणून त्याचा निरस्कार करीत आहेत आणि तिमरे या योजनेमध्ये काही चागले आहे व काही वाईट आहे असें म्हणून सरकार जर आम्ही सागू त्या सुधारणा त्यात करीत असेल तर काही शर्तीवर आम्ही आमच्या पद्धतीने तो चालवू असें म्हणत आहेत अशा तीन प्रकारचे लोक आमच्यात आहेत कवीने म्हटले आहे, 'हाथी चलत है अपनी गती !' हें लिहिण्याचा अधिकार कवीचा आहे. उच्चार करणे एवढाच माझा अधिकार आहे. तेव्हा कम्यूनिटी प्रॉजेक्टचा हत्ती आपल्या चालीने चालत राहू दे. आपण आपले विचार दृढ कसे होतील याचेंच चोवीस तास चिंतन करीत रहावें. दुसऱ्याचें खंडन करण्यात आम्ही पडलो तर तितका वेळ आपलें काम करण्यास कमी पडतो. हा मी शक्ति-क्षय समजतों म्हणून अशा खडनांत मी पडत नाही. पण आमचे कित्येक लोक एका बाजूने त्यांचें खडन करीत आहेत आणि दुसऱ्या बाजूने त्यात गुतूनहि पडत आहेत. या दोन्ही गोष्टी चूक आहेत. त्यामुळे आपले नुकसान होईल असें मला वाटतें.

## फक्त दोनच पक्ष : सज्जन आणि दुर्जन

वेगवेगळ्या राजकीय पक्षांसंबंधी आपली वृत्ति काय असावी ही आणखी एक गोष्ट आहे. सारे राजकीय पक्ष एक व्हावेत असा माझा प्रयत्न आहे. तसे झालें नाही तरी एखादा

सर्वमान्य कार्यक्रम लोकांपुढें ठेवून लोकांनी तेवढ्यापुरतें पक्षभेद विसरून सहकार्य करावें, अशी तरी मी खटपट करीत राहीन. म्हणजे आज जे पक्षामध्ये भेद आहेत ते कमी होतील, एकता वाढेल. आपल्याला एक प्रत्यक्ष कार्यहि असे मिळाले आहे की ज्याने देश पुढे जाईल. लोकाची शक्ति वाढेल आणि त्या कामात जर आम्ही गढून गेलो तर १९५७ मध्ये जी निवडणूक होईल तिजमध्ये सज्जन-सज्जनामध्ये झगडा राहणार नाही. आज कौरव-पांडवांमध्यें युद्ध चालू आहे. कौरवांच्या पक्षात कांही चागले लोक आहेत आणि पांडवाच्या पक्षात काही वाईट लोक आहेत. दोन्ही पक्षामध्ये चागले-वाईट लोक आहेत आणि एका सज्जनासमोर दुसरा सज्जन लढाईला उभा आहे, अशी स्थिति राहतां उपयोगी नाहीं. एका बाजूला सारे सज्जन ' दुसऱ्या बाजूला सारे दुर्जन असे झाले पाहिजे दुर्जनतेविरुद्धच सज्जनतेने लढले पाहिजे.

## भारतीय लोकसत्तेचा आदर्श : पांचां मुखीं परमेश्वर

पण पाश्चात्यांनी डेमॉक्रसीचा जो प्रकार आम्हास दिला आहे ती लोकशाही दोन पक्ष जरूर आहेत असे मानते. त्याच्या सहयोगाने आणि सघर्षाने राष्ट्र नीट रस्त्यावर राहते. दोघाचेहि दोष प्रतिपक्षाच्या टीकेमुळे उघडे पडून दुरुस्त होऊ शकतात. ही डेमॉक्रसीची पाश्चात्य कल्पना आहे. त्या विचारात काही गुण आहेत पण जे दोष आहेत त्यांचें निराकरण करणे जरूर आहे. आमचा म्हणजे हिदुस्थानचा सर्व राजकीय अनुभव ग्रामपचायतीमध्ये सामावला होता. तो अनुभव ते दोष दूर करण्याला उपयोगी पडेल. ग्रामपचायतीचा कारभार 'पाच बोले परमेश्वर'

ह्या तत्वावर चालत असे. ‘पांच बोले परमेश्वर’ याचा अर्थ एक दोघांच्या वाणीमध्यें किंवा तीन अथवा चार याच्या वाणीत परमेश्वर नाही. पांचांचें एकमत होईल तेथेच परमेश्वर. आता आपण राजकीय गोष्टीत बहुमताने बनविलेल्या कायद्याला मान्यता देतो. पण पचायतीमध्यें पाची पचाचें एकमत होईल तेव्हाच कुठलाहि प्रस्ताव मान्य होतो यालाच मी ‘पांच बोले परमेश्वर’ म्हणतों. या विचारानें जर आपण काम करू लागलों तर आज जगामध्यें बहुमत, अल्पमताचे जे प्रश्न उत्पन्न होतात ते सर्व मिटून जातील.

## सर्व-संमत गोष्टीवरच अंमल

सर्वांनी मिळून देशसेवेचा आपला विचार शुद्ध कसा होईल असा प्रयत्न करीत राहिलें पाहिजे. वेगवेगळ्या पक्षाच्या लोकांच्या विचारामध्येंहि खूप भाग समान असतो. सज्जन माणसाच्या विचारामध्ये जे मतभेद असतात ते अगदी गौण असतात. त्यांच्यामध्यें बरीचशी एकता असते. तेव्हा ज्यावर एकमत आहे अशा विषयांचाच आपण कार्यक्रम बनविला पाहिजे आणि ज्या विषयी मतभेद आहे तो अधिक चर्चेकरितां राखून ठेऊन त्यावर अम्मल करणे तहकूब ठेवले पाहिजे. सज्जनामध्ये एखाद्या विषयावर मतभेद असेल तर चार सज्जनाविरुद्ध पांच सज्जन असा निर्णय करून त्यांच्या बहुमतावर निर्णय ठरविणें हें चूक आहे. सज्जनांमध्यें ज्या विषयावर मतभेद आहे तो आचरण करण्यालायक नाही असें मी मानतों. त्यावर अधिक चिंतन, चर्चा होण्याची जरुरी आहे. वेगवेगळ्या सज्जनामध्यें ज्या विषयीं मतभेद नाही तेवढाच विषय अमलांत आणणेसाठी

लोकांपुढे ठेविला जावा. सज्जन कोणाला म्हणावे व कोणाला म्हणू नये असा प्रश्न या ठिकाणी निर्माण होईल. त्यात पडण्याची माझी इच्छा नाही व तो आताचा विषयहि नाही. वेगवेगळ्या पक्षांमधील मतभेद मिटविण्याचा पुरुषार्थ आपण दाखविला पाहिजे एवढेच येथे सांगून ठेवतो. वरवर दिसणारे भेद बाजूस सारून, त्याखाली असणारी एकता आपण ओळखली पाहिजे असें गीतेनें आम्हाला शिकविले आहे. तेव्हाच कार्याची समान भूमिका निर्माण होईल. नाही तर भिन्न विचार राहणारच. वेगवेगळे विचार हे विचार करण्याचे विषय रहावे हे चांगलें! हा एक तत्त्वज्ञानाचा सिद्धांत आमच्या शास्त्रकारांनी मांडला आहे.

## हिंदुधर्मांत आचरणशास्त्रांत भेद नाहीं.

हिंदुधर्मामध्ये आस्तिक दर्शन आणि नास्तिक दर्शन अशी दोन्ही दर्शने आहेत. अशी दोन्ही दर्शने हिंदुधर्म आपल्यामध्ये सामावून घेऊ शकतो. ही दर्शने एकमेकांविरुद्ध अतिशय तीव्रतेने बोलतात विचाराची स्वतंत्रता संस्कृतांत जितकी आहे तितकी दुसऱ्या कोणत्याहि साहित्यात मला आढळली नाही. हे वाग्युद्ध पहात राहण्यासारखे असते. परंतु रामानुजाचार्य आणि शंकराचार्य एकमेकाविरुद्ध कितीहि जोराने विचार प्रकट करीत असले, वाद करीत असले तरी आचार-शास्त्रामध्ये दोघांत मतभेद नाही. सत्य, अहिंसा, सदाचार, काही विधिनिषेध दोघेहिजण मानतात. रामानुजाचार्यांचें राज्य असले तरच सकाळी लवकर उठले पाहिजे. शंकराचार्यांचे राज्य असले तर तशी जरुरी नाही असें कधी होत नाहीं.

## सर्वमान्य विषयाचाच प्रोग्राम करावा.

तेव्हां आचरणाचे जे क्षेत्र आहे त्या क्षेत्रामध्ये एकतेच्या आधारावर आपण चाललों तरच आपलो आणि देशाची प्रगति होईल आणि समाजाला स्थैर्य लाभेल. विचारामध्ये फरक असेल त्यावर चर्चा करावी, वादविवाद करावा, बारकाईने छाननी करावी जोंपर्यंत माझा विचार आपल्याला पटलेला नाही तोपर्यंत तो समजाऊन सांगण्याचा मी प्रयत्न करीत राहीन आणि जोंपर्यंत तो आपल्याला पटला नाहीं तोपर्यंत त्यानी मान्यहि करू नये असे झाले पाहिजे. आपल्याला या बाबतीत पूर्ण स्वतत्रता असली पाहिजे. परतु आपण काम करण्याचा कार्यक्रम असा ठरविला पाहिजे की त्याबाबतीत सज्जनाची पूर्ण मान्यता असेल. बधु हो! सरकार आणि भिन्न भिन्न पक्ष यांच्याशी आपले सबंध कसे असावेत ह्या विषयावर माझे म्हणणें सांगून हा एक विषय मी पुरा करतों.

## भू-दान-यज्ञ ईश्वरी संकेत

दुसरी गोष्ट आपल्या सस्थांची रचना कशी असावी याबद्दल थोडे बोलतों. या कामाला सुमारे दोन वर्षापूर्वी तेलगणात आरभ झाला. ज्या गावात सुरवात झाली तेथील काही लोक या समेलनात हजर आहेत. हरिजनांनी ८० एकर जमीन मागितली आणि ज्यानी पहिलेंच दिवशी १०० एकर जमीन दिली, तेहि येथें आलेले आहेत. त्या गांवच्या वातावरणांत ही गोष्ट कशी सहज निघाली हे आपण त्यांना विचारू शकता. त्या दिवशी तो ईश्वराचा साक्षात्कारच झाला असें मला वाटलें. आणि आपण आता काय केले पाहिजे याचा मी विचार करू लागलों. असा

ईश्वरी साक्षात्कार न होता मी केवळ माझ्या स्वतंत्र बुद्धीने या प्रश्नाचा विचार करीत राहिलों असतों तर भूमिदानामागून जमिनीचा प्रश्न सोडविण्याची गोष्ट मला सुचली नसती. मंदिर-मशीद-मठ याकरितां १००, १५०, ५००, १००० एकर जमीन दान मिळू शकतें. लोकांनी तशी मिळविलीहि आहे. परंतु जमिनीचा प्रश्न सोडवायला कोटयवधि एकर जमिनीची जरुरी होती आणि ती जमीन लोकामध्यें सद्‌बुद्धि जागृत करून मिळवावयाची एवढी हिम्मत माझ्यामध्ये नव्हती. परंतु ईश्वराचा इषारा मिळाल्यानंतरहि जर हें काम फार कठीण आहे म्हणून तें हाती घेण्यामध्ये मी का कू करूं लागलों असतों तर अहिंसा भ्याड ठरली असती व तिच्या हातून कोणतेंच काम होणार नाही हें सिद्ध झालें असतें. म्हणून काम कठीण होतें तरी ईश्वरावर भरंवसा ठेवून तें हाती घेणें मला जरूर वाटलें. त्यावेळी मी आपल्या जोडीदारांचाहि सल्ला विचारला नाही, कारण असा सल्ला विचारावयाला गेलों असतों तर हा कार्यक्रम हाती घ्यावा असा सल्ला कोणीहि मला दिला नसता. प्रत्येकजण म्हणाला असता, ही गोष्ट होण्यासारखी नाही. योगायोगाने एखाद्या गांवी मिळाली तर ती वेगळी गोष्ट आहे, पण सर्व देशाकरितां असा कार्यक्रम करणे व्यवहार्य नाही. माझे अगदी जवळचे मित्र होते. त्यांचाहि हाच अभिप्राय होता आणि ईश्वराचा साक्षात्कार मला न होता दुसऱ्या कोणाला झाला असता व तो जर माझा सल्ला विचारावयाला आला असता तर त्याला ही गोष्ट अशक्य आहे असाच मीहि अभिप्राय दिला असता. सांगितलें असतें की, एका गांवीं घडलें एवढया-वरून आपण असा प्रोग्राम निश्चित करूं शकत नाही. मनांतहि

असा संकल्प करूं शकत नाही. म्हणून मी कोणाला सल्ला विचारण्याच्या भानगडीत पडलों नाही. नशीब अजमाऊन पाहण्याचें ठरविलें आणि ईश्वरावर भरंवसा ठेवून मागणी सुरूं केली. मागता मागतां त्या दानामध्यें मागे पुढे वर खाली कोणतें भाव आहेत ह्याचें रोज रोज नवेंनवें दर्शन मिळत गेलें. त्या वेळची झालेली पांचपन्नास व्याख्यानें जर वाचाल तर त्या प्रत्येक व्याख्यानात आपल्याला कांही तरी नवीन आढळून येईल. याप्रमाणे हा विषय उत्तरोत्तर अधिक स्पष्ट होत गेला. जमीन मिळतच गेली आणि तेलंगणात एका नवीन दर्शनाचा लाभहि झाला. तरीहि मनात एक शंका येणें स्वाभाविक आहे. माझ्या मनांत तितकी नव्हती पण दुसऱ्यांना बरीच शंका वाटत होती तेलगणामध्यें एक विशेष पार्श्वभूमि होती म्हणून तेथें जें घडले तसें दुसऱ्या ठिकाणी घडेलच असे नाही. पण पुढें दिल्लीला जाण्याची संधि मिळाली. प नेहरूनी ताबडतोब येण्याचें निमत्रण दिलें होतें. त्याच्या आज्ञेप्रमाणें मी ताबडतोब निघालो पण माझ्या रिवाजाप्रमाणे पायीच जाण्याचें ठरविले. वाटेमध्ये माझें म्हणणें लोकांना सांगत गेलों आणि तेलगणांत त्या कामी जितका उत्साह दिसून आला, तितकाच उत्साह दिल्लीस जाताना दिसून आला. यावरून एक गोष्ट स्पष्ट झाली की तेलगणाची काही विशेष परिस्थिति नव्हती नव्या युगाला साजेशीच ही गोष्ट आहे. या जमिनीच्या मागणीला कालप्रवाह अनुकूल आहे असें दिसून आलें. जमीन मिळतच गेली आशि आम्ही ती घेत गेलों पण जेव्हां उत्तर-प्रदेशांत हिंडण्याची गोष्ट निघाली तेव्हां मी कोटा म्हणजे एक निश्चित आकडा ठरविला आणि तसा संकल्प केला. आकडा लहानसाच होता. पण तो समोर ठेऊन काम सुरू केलें

उत्तर प्रदेशात कार्यकर्त्या मित्रांची सख्या फारशी नव्हती पण त्यानी फार बहाद्दुरीने काम केले. सतत दहा महिने त्यांनी अविश्रात धांवपळ केली. ज्यानी या कामात आपल्याला वाहून घेतले त्यांच्या सहकार्याने असें दिसून आलें की, केलेला सकल्प सिद्ध होऊं शकतो आणि आज आपला सकल्प जवळ जवळ पूर्ण झाला आहे असें त्यानी सम्मेलनात जाहीर केले आहे. ५ लाख एकर जमा करावयाचे होते. ४॥। लाख एकर मिळून गेले आहेत. उरलेले २५ हजार सहज जमतील एवढेच नाही तर पुढच्या वर्षी सर्व मिळून अकरा लाख एकर जमा करण्याचा त्यानी निश्चय केला आहे. या समेलनांत तो निश्चय त्यानी जाहीर केला आहे व आपल्या खाजगी बैठकीमध्यें गंभीरतापूर्वक ईश्वराला साक्ष ठेवून तो पूर्ण करण्याचा सकल्पहि केला आहे.

## बिहारचा जमिनीचा प्रश्न पूर्ण सोडविण्याचा निश्चय

हें उत्तर प्रदेशात घडले. या प्रमाणे सर्व हिंदुस्थानभर मी फिरलो तर दरसाल २।३ लाख एकर जमीन मला मिळेल. सर्व हिंदुस्थान फिरावयाला मला ५।६ वर्षे लागतील. आणि १०।२० लाख एकर जमीन मिळून जाईल, पण तेवढयाने जमिनीचा प्रश्न सुटत नाही; एका निश्चित मुदतीत हा प्रश्न जर आम्ही सोडविला नाही तर चालणार नाही, कारण काळाची गति फार वेगाची आहे. जुन्या काळाप्रमाणें संथ नाही. आम्ही या प्रकारें हा कार्यक्रम शंभर वर्षे चालवू म्हटलें तर तें योग्य होणार नाहीं. लोकोपकाराचें एक साधन त्यामुळें मिळेल पण त्यामुळें समाज-रचना बदलणार नाहीं. सामाजिक-क्रांति होणार नाही. म्हणून एखाद्या ठिकाणी तरी हा प्रश्न

पूर्णत्वानें सोडविण्याची खटपट केली पाहिजे असें मला वाटलें. बिहार प्रांत तसा फार मोठाहि नाही व लहानहि नाही. येथे सद्भावनेचा अंश आहे. दुसऱ्या प्रदेशापेक्षां या ठिकाणी सद्भावना विशेष जास्ती आहे असे मी म्हणणार नाही पण कमी तरी खास नाही. ज्या ठिकाणाहून बुद्ध भगवानांनी साऱ्या जगाला अहिंसेचा संदेश दिला ती भूमि अहिंसेला विशेष अनुकूल होईल अशी मला श्रद्धा वाटली. म्हणून बिहारचा प्रश्न हाती घ्यावा आणि येथील जमिनीचा प्रश्न सुटल्यावरच येथून जावे असा निश्चय करावा असें माझ्या मनांत आले.

## सुरवातीचा अनुभव

ज्या दिवशीं बिहारमध्यें प्रवेश केला त्याच दिवशी तो निश्चय मी जाहीर करून टाकला. पण बिहारमध्ये फिरूं लागल्यावर अनुभव वेगळा आला. जमिनीत खडक लागला. जेथे खडक लागतों त्या ठिकाणी जादा मेहनत करावी लागते, पण खडक फुटला तर त्याच्या खाली पाण्याचा सुंदर झरा वहात असलेला सांपडतो. खडकाखाली जें पाणी असतें तें अगदी निर्मळ स्वच्छ असतें. म्हणून मेहनत जरी जादा पडली तरी त्यायोगें येथील काम अगदीं निर्मळ-स्वच्छ होऊन जाईल. उपनिषदांमधील 'अस्तीत्येन उपलब्धव्य' या वाक्याने आम्हाला असें समजावून दिलें आहे 'अस्ति' म्हणा म्हणजे तें काम होणारच आहे. 'नास्ति'ची भाषा बोलूं नका. पहिल्या दोन महिन्यांत विशेष दान मिळालें नाही तरी 'मी संकल्प केला आहे, पण प्रश्न तर मोठा कठीण आहे' असें माझ्या मनांत कधी आलें नाही कारण उत्तर प्रदेशांतहि कामाची गति पुढे पुढेंच वाढली. त्याप्रमाणें

विहारमध्यंहि वाढेल अशी माझी अपेक्षा होती. तसें झालें नाही. आपले राष्ट्रपति सारण जिल्ह्याचे नागरिक आहेत. त्यांनी भूमिदानयज्ञाला विहारमध्यें जोर व्हावा आणि विशेषेकरून सारण जिल्ह्यात जास्त प्रगति व्हावी असें पत्रक आपल्या सहीनें काढले. त्याच्या हजारो प्रति वाटल्या गेल्या तरी देखील त्या ठिकाणीं आम्हाला पधरा दिवसात मुष्कीलीने १ हजार एकर जमीन मिळाली. काही दिवशी १।२ एकरापेक्षा जास्त मिळाली नाही. त्या दिवशी मी कार्यकर्त्यांना काहीसा दम दिला; तेव्हा त्यानी थोडी गति वाढविली.

## भगवान बुद्धाच्या तपस्या-भूमींत एक लाखाचा संकल्प

सुरवातीला असे अनुभव आले होते. अशा स्थितीत मी गया जिल्ह्यांतील एका लहान खेडयात प्रवेश केला. साधारणत: रात्री अथरुणावर पडताच मला झोप लागते. परंतु त्या दिवशी नेहमी सारखी लगेच झोंप आली; पण जलदी जागहि आली. सुमारे एक वाजला होता. माझ्या मनात विचार-चक्र सुरू झाले. गया जिल्हा भगवान् बुद्धांच्या तपस्येचें स्थान आहे. शिवाय कोटयवधि हिंदु लोक या ठिकाणी श्राद्धाकरितां येतात. श्राद्धाचा अर्थच श्रद्धेचें स्थान असा आहे. तेव्हां हिंदुधर्माचे श्रद्धास्थान आणि बुद्धधर्माचें उगमस्थान ही काही लहान गोष्ट नाही. तेव्हां अशा ठिकाणी पहिला हप्ता म्हणून एक लाख एकराचा संकल्प करावा असें मला सुचले. उठल्यावर जे दोनचार सोबती बरोबर होते त्याना हा संकल्प सांगितला आणि गांवच्या लोकांची सभा झाली त्यांच्यापुढें तो मी ठेवला. त्यांनी त्याला मान्यता दिली. आजपर्यंत काय काम झालें हें प्रसिद्धच आहे.

चार लाखाचा संकल्प केला गेला होता. कॉंग्रेसवाल्यानी ते हाती घेतला. त्यावरहि टीका झाली. लोक म्हणू लागले, "भूदान आता कोणीकडे चालले?" कॉंग्रेसवाल्यांच्या म्हणजे बदमाशाच्या हातात ही चळवळ गेली यांप्रमाणे जर आम्ही दुसऱ्याला नांवे ठेवू लागलो तर आम्हाला अहिंसा समजली नाही असें होईल एखाद्याने आमचा हात पकडला तर त्याने आम्हाला पकडले असे न होता, तोच आपल्या हाती सापडला असे झाले पाहिजे.

## एका प्रांताचा प्रश्न पूर्ण सोडवावा

बिहारमध्यें अधिकात अधिक शक्ति लावून काम करावे त्यातल्यात्यात एक दोन जिल्ह्यात पूर्ण शक्ति लावून त्या जिल्ह्यातील जमिनीचा प्रश्न निकालातच काढावा अशी योजना- जिला मी व्यूहरचना म्हटलें आहे-करण्याचें माझ्या मनाने ठरविले त्या दिवशी श्री. जयप्रकाशजी म्हणाले त्याप्रमाणे गया किंवा दुसऱ्या कोणत्या तरी जिल्ह्यात तीन लाख एकर मिळवून एका जिल्ह्याचा तरी प्रश्न पूर्ण निकालांत काढावा असें मला वाटलें असे करिताना काही सरकारी साहाय्य घ्यावें की नाही असा प्रश्न पुढे आला तेव्हा कायद्याची नाही तरी सरकारी पडित जमीन घेण्यापुरती सरकारी मदत घेणे गैर दिसलें नाही. कारण जेव्हां सर्व प्रांतांत फक्त २ लाखच जमा करायचे होते तेव्हांची गोष्ट वेगळी होती. तेव्हां या मदतीचीहि जरूरी नव्हती. पण जेव्हां सर्व प्रांताचा प्रश्न पूर्णपणेच सोडवायचा व त्याकरिता ३२ लाख ४० लाख १ कोट एकरांची भाषा आम्ही बोलू लागलो तेव्हां सरकारी जमीन घेण्यास मुळीच हरकत नाहीं असें मला वाटलें तेव्हा एवढ्यापुरतें सरकारचें साहाय्य घेऊन सर्वांच्या

सहकार्यानें कायद्याशिवाय म्हणजेच दंडशक्तिचा उपयोग न करतां एका जिल्ह्यातले काम जर पुरे करता आले तर हिंदुस्थानच्या कोठल्याहि भागात तसें घडावयास कोणचीहि अडचण नाही. ज्याचा परिणाम सर्व भारतावर होईल असा एखादा नमुना किंवा आदर्श लोकांपुढे ठेवावा अशी माझी दृष्टि होती. त्यायोगे आपल्या कार्यक्रमावर लोकाचा विश्वास व निष्ठा वाढेल.

## पहिली मागणी : सर्व धर्मान् परित्यज्य

एकदां विश्वास पटला की, सर्व कार्यकर्ते एक होतील व हा प्रश्न सुटावयास वेळ लागणार नाही. म्हणून आपल्या हातातील दुसरी चांगली महत्वाची देखील कामे सोडून आपआपल्या प्रांतांत हें काम करण्याकरिता एक वर्षभर पूर्ण वेळ द्या अशी मी आपल्यापाशी मागणी करतों आपल्याला अधर्म तर सोडावयाचाच आहे, पण अशा वेळी धर्म म्हणजे विहित कार्यहि सोडावें लागतें. 'सर्व धर्मान् परित्यज्य, माम एकं शरणम् व्रज–' सर्व धर्म सोडून मला शरण ये–हा भक्तिमार्ग आहे. आम्ही ज्यावेळी भक्तीची गोष्ट बोलतो तेव्हा जर इतर छोटचा छोटचा धर्माचीहि जर सोय करू लागलो तर आम्ही निष्ठावान ठरणार नाहीं व आमची भक्ति सफल होणार नाहीं. सर्व धर्माचाहि त्याग करावा लागणे ही भक्तिमार्गाची विशेषता आहे. आपल्याला सर्व समाज एकरूप एकरस बनवावयाचा आहे हे काम भक्ति शिवाय होणार नाही म्हणून हा आपला भक्तिमार्गच आहे. लोकात प्रेमभाव उत्पन्न करणे हाच आता आमचा मुख्य धर्म आहे. बाकीची लहान लहान कामें, छोटे छोटे धर्म या मदतीकरिता आम्हाला सोडले पाहिजेत. तेव्हां या मुख्य कामाकरितां इतर कामे सोडावीत अशी माझी मागणी आहे.

## दुसरी मागणी : बिहारमध्यें कामाला या.

दुसरी एक गोष्ट मला सांगावयाची आहे. आपआपल्या प्रातांत जे लोक काम करीत आहेत तसें त्यांनीं करावेंच, परतु वेगवेगळ्या प्रांतांतून कांही लोक बिहारकरिता दोन चार महिने देतील तर चागलें होईल. त्यात दोन फायदे आहेत. बिहारमध्यें जे पक्ष-भेद आहेत, जे दूषित वातावरण आहे, तें नाहीसे व्हावें असा माझा प्रयत्न आहे हे ईश्वराच्या कृपेनेच काय तें घडेल इतका तो प्रश्न गंभीर झाला आहे मुळात विशेष फरक नाही. लहान मुलातील भांडणासारखे हे भाडण आहे विशेष काही कल्पनाभेद नाहीत. विचारभेद नाहीत. पण तटे आहेत खरे. बाहेरील लोक येतील. ते कोणच्याच पक्षाकडे झुकणार नाहीत. ते तटस्थ राहतील आणि त्यामुळे पक्षभेद नाहीसे होण्यास मदत होईल. त्यानाहि येथे कसे काम चालले आहे याचा अनुभव मिळेल. येथल्यासारख्या वातावरणांत कसें काम करावें याचें थोडे शिक्षणहि मिळेल ते आपल्या प्रातांत परत जातील, तेव्हा या शिक्षणाचा त्यांना तेथें उपयोग होईल. आपल्या प्रांतांतील काम मात्र कमी करून यावें असें माझे म्हणणे नाही; पण थोडे-तरी लोक दोन-चार लहान मोठे कार्यकर्ते बिहारकरितां देतील तर बरें होईल ही माझी दुसरी मागणी आहे.

## तिसरी मागणी : बिहारी लोकांनीं एक जिल्हा पुरा करावा.

माझी तिसरी मागणी बिहारच्या लोकांजवळ आहे. त्यांनीं एकदोन जिल्हे निश्चित करून अधिकांत अधिक शक्ति तेथें लावावी. काही उरलीच तर दुसऱ्या ठिकाणी काम करावें. या प्रमाणे ते करतील आणि दोनतीन महिन्यांत एखाद्या जिल्ह्याचें

काम पुरें करतील तर ती फार आनंदाची गोष्ट आहे. तुम्ही बिहार प्रांतातच अडकून पडला, दुसऱ्या प्रांतांत येऊं शकला नाहीं तर तें हिताचें आहे काय? या तऱ्हेची कार्यपद्धति चांगली होईल काय? असें लोक विचारतात. उत्तरी मी सांगतों की चांगलें होईल. एखाद्या जागी देखील आम्ही निश्चित मुदतीत आमचा कार्यक्रम पुरा करणें हेंच अधिक चांगलें आहे. कारण मग असलें काम पुरें करावयाला किती कार्यकर्त्यांना किती दिवस लागतील एवढे गणिताचें काम उरतें. असा सर्व हिंदुस्थानचा प्रश्न सुटेल. तितके कार्यकर्ते मिळाले नाहीत तर ती वेगळी गोष्ट आहे. पण जर कार्यकर्ते मिळाले तर काम पुरें होऊं शकतें हे सिद्ध करून दाखविणें हें यावेळी अत्यत जरूर आहे

## पुढील वर्षीं दुसऱ्या प्रांतांत जाऊं इच्छितों

बिहारच्या लोकाना मी सांगून टाकलें आहे की येथील काम पुरे होईपर्यंत मी येथेच राहणार आहे. पण पुढील समेलन दुसऱ्या प्रातात व्हावे अशी इच्छा आहे. पण मी जेथें असतों त्या ठिकाणीच समेलन भरण्याची जरुरी लोकांना वाटत आहे. म्हणून येथील लोकांनी आपला कार्यक्रम पुरा करून, म्हणजे एका वर्षाचें आंत ३२ लाख एकर जमीन मिळवून, मला दुसऱ्या प्रांतांत जाण्यास मुभा दिली तर फार चांगले होईल.

## दुसऱ्या प्रांतांनीं कांहीं काम केलें नाहीं तर?

आपण पुढील वर्षाचें आंत सर्व हिंदुस्थानांत २५ लाख एकर मिळविण्याचा संकल्प केला आहे. पण जर आपण बिहार-मध्येंच ३२ लाख एकर मिळविले तर आपल्या संकल्पांत कमी-पणा येणार नाहीं. हा आमचा बेत यशस्वी झाला नाही तरी

फार बिघडणार नाही. पण जर कां यशस्वी झाला तर पाहतां पाहतां दुसऱ्या प्रांतामध्ये क्रांति होऊन जाईल विशेष काही काम करावें लागणार नाही. बिहारमध्ये आपण म्हणतों तितकी जमीन मिळाली आणि तरीहि दुसऱ्या प्रातातले लोक काहीहि न करता स्वस्थ बसले तर काय होईल ? असा एका मित्राने प्रश्न विचारला. मी त्याला उत्तर केलें, ' तुमचा प्रश्न मानसशास्त्राविरुद्ध आहे. मानसशास्त्र याप्रमाणें काम करीत नाहीं. पण घटकाभर कल्पना करा की, दुसऱ्या प्रांतात कांहीहि काम झालें नाही तर त्या ठिकाणी खालील दोन तीन गोष्टींपैकी एक गोष्ट घडून आल्याशिवाय राहणार नाही एक तर असें होईल की त्या प्रांतातले लोक बड करून उठतील नाही तर तेथलें सरकार बिहारचा प्रश्न सुटताच कायदा तरी करील. म्हणजे कायद्याने तरी काम होऊन जाईल किंवा बंड म्हणजे राज्यक्रांतीने होऊन जाईल. परतु एका प्रांतात इतकी मोठी घटना घडून आल्यावर तिचा परिणाम दुसऱ्या प्रांतांवर कांहीहि होणार नाही, इतका मानवसमाज छिन्नविछिन्न झालेला नाही. एका ठिकाणच्या मानव समाजाला जो अनुभव येतो तो लागलीच दुसऱ्या ठिकाणी पोहोंचतो आणि लोकामध्यें त्याचा परिणाम होण्याची परिस्थिति किंवा संवेदनक्षमता यावेळी लोकात पुष्कळ आहे. केवळ हिंदुस्थानांतच नाही तर जगातील इतर देशामध्येहि आहे. तेव्हा बिहारचा परिणाम दुसऱ्या प्रातावर होणार नाही अशी कल्पना करण्याची जरूरी नाही माझा पुढील कार्यक्रम काय आहे तो मी आपल्यापुढे मांडला आहे.

तिसऱ्या विषयाची चर्चा सध्याकाळी करीन. आतां येथेच संपवितों.

# प्रवचन तिसरें

गेल्या वर्षी आपण जे काम केले त्यासबधी वेगवेगळ्या प्रातांच्या कार्यकर्त्याबरोबर मी चर्चा केली. त्यावेळी कार्यकर्त्याना प्रोत्साहन देण्याकरिता मी काही कठोर शब्दहि बोललों. लोकानी ते प्रेमाने सहन केले. पण त्याबद्दल सर्व लोकासमोर मी त्याची क्षमा मागतों. अधिक व्यवस्थित रीतीने काम केलें असते तर काही थोडे जास्त काम झाले असते; तरी पण गेल्या वर्षी झालेले काम एकदरीत ठीक झालें आणि त्याविषयीं असमाधान वाटण्याचें काही कारण नाही, असें आपण म्हणू शकतों गेल्या वर्षी ७।८ लाख एकर जमीन गोळा झाल्याचा उल्लेख कालच्या ठरावांत आला आहे. जें काम झालें ते करण्यात ज्यानी भाग घेतला त्याना ती गौरवाची गोष्ट आहे यांत शका नाही. कार्यकर्त्याना आश्वासन देण्यासाठी हे दोन शद्व मी येथे बोललों.

## अंतर्-निरीक्षणाची आवश्यकता

आतां पुढच्या वर्षी याहून पुढें जावयाचें आहे; आणि जो निश्चय केला आहे तो पुरा करावयाचा आहे. हें काम तर विशेष कठीण नाही. कामाला या वर्षी ११ महिने मिळाले, पुढील वर्षी १३ महिने मिळणार आहेत. योजना चांगली झाली आहे आणि कार्यकर्तेहि आतां जागृत झाले आहेत; तेव्हां योजिलेलें काम होईल अशी मला उमेद वाटते. तथापि आपलें काम व्यापक आहे. उद्दिष्ट उच्च आहे. त्या दृष्टीनें आपण अंतर्-निरीक्षण करून त्या उद्दिष्टाला लायक बनलें पाहिजे. आपल्यांत जे दोष दिसतील ते काढून टाकले पाहिजेत. आम्ही

आपल्या दोषांची दुसऱ्या लोकांच्या दोषांशीं तुलना करून त्यापेक्षां आपण उच्च आहों असें न ठरविता स्वतंत्ररीत्या आपलें निरीक्षण केलें पाहिजे. आपल्यांत जे दोष आहेत, ते दुसऱ्यांतहि आहेत म्हणून आपल्याला समाधान वाटतां कामा नये.

## असहिष्णु होऊं नका

काल एक गृहस्थ बंगाली भाषेचा प्रश्न आपल्यापुढें ठेऊं इच्छित होते. आवेशानें ते काही शब्द बोलले त्यामुळे लोकांच्या मनांत धीर राहिला नाही. 'खाली बसा, खाली बसा' असें सारेजण ओरडू लागले. लोकांनी जर धीर ठेवला असता तर ते त्याचें हृदय जिकू शकलें असते. कारण बोलणाऱ्यानी सुरवातीसच आपलें म्हणणें सभेपुढें ठेवण्याला सम्मति मिळाल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केली होती. त्यांना माहीत होते की, सभेचा उद्देश वेगळा आहे. कामहि पुष्कळ पडलें आहे. तरीहि त्यांच्या स्थानिक प्रश्नाला जागा मिळाली ही गोष्ट त्यांनीं कबूलहि केली. त्यांचें भाषण शांतपणें सहन केलें असतें तर एका मनुष्याचें अंतःकरण आपण जिकले असतें. पण झाले उलटेच! त्याचें अंतःकरण दुखविले गेले. जरी त्याना आपले म्हणणे मांडण्याची संधि मागाहून दिली गेली तरी त्याच्या मनावर झालेला आघात दुरुस्त झाला नाही. तोडणें सोपें असते, जोडणे कठीण असतें. त्यांचा धिक्कार करण्याचें जें प्रदर्शन झालें तें सामुदायिक झालें. एखाद्या व्यक्तीनें अडवणूक केली असती तर ती व्यक्तिगत गोष्ट झाली असती. पण या ठिकाणीं समुदायांतल्या अनेक व्यक्ती एकदम बोलूं लागल्या तें दृश्य फार दुःख-

दायक होतें. ती कांहीं क्षणिक किंवा आकस्मित घडलेली गोष्ट नव्हे. हा एक दुर्गुणच आमच्यांत आहे. त्याला आपण असहिष्णुता म्हणतो.

## आत्मवंचना हानिकारक

पण त्याहून अधिक गभीर गोष्ट त्यांत आहे. आम्ही सर्वोदय-सेवक आहों, सर्वोदयाची भावना बाळगतों, म्हणून आपण स्वतःला एक प्रकारे पुण्यात्मे समजतों. कित्येक लोक आपल्या पत्रावर आपला सर्वोदय सेवकाचा नबरहि घालतात. एकाने तर सर्वोदयाचा नंबर आपल्या पत्रावर छापून घेतला आहे! यांत कांही विशेष दोष आहे असे नाही पण त्यावरून मला असे वाटतें की, सर्वोदय-सेवक असणें किंवा तसें विचार बाळगणें—मग तदनुसार आपला आचार होवो वा न होवो—हेच एक मोटें पुण्य-कार्य आपण करीत आहोंत आणि त्या योगे आपण काही उच्च कोटीचे बनलों आहोंन, अशी कल्पना लोकांच्या मनात असण्याचा संभव मला दिसून आला. अशी जर आम्ही आत्म-वंचना केली तर त्यांत आपलें नुकसान आहे. आपण अति नम्र झाले पाहिजे आणि आपण सेवक आहोंत, आणि दुनिया आमची सेव्य आहे असें समजलें पाहिजे. सेवकाचे नाते हे नम्र नाते आहे. त्याहून भिन्न असे जर आपण स्वतःला उच्च विचाराचे म्हणून समजू लागलों तर एके काळी ब्राह्मणाची जशी अवस्था झाली तशी आमची होईल. ब्राह्मण ज्ञानपरायण होते, पण त्याना ज्ञानाचा अभिमान वाटू लागला. स्वत.ला ते उच्च मानू लागले हा एक दोष आहे; आणि आपण तो काढून टाकून अधिकांत अधिक नम्र होण्याचा प्रयत्न केला पाहिजे असें मला वाटते.

## कार्यकर्ते विचाराचें अध्ययन करीत नाहींत.

दुसरी एक उणीव आमच्यात आहे. ती म्हणजे आपण बहिर्दृष्टीनें विचार करतों खोलात शिरून विचाराचें अध्ययन करीत नाही, हा माझा आक्षेप गेल्या कित्येक वर्षाचा आहे. आमचे कार्यकर्ते जे रात्रंदिवस कामातच गुतलेले असतात तेहि विचाराचें अध्ययन करीत नाहीत. मी केवळ शास्त्रीय अध्ययनासंबधी हे म्हणत नाही. पण आपण जे काही काम करतों त्याच्या मुळाशी काही विचार आहेत आणि ते बरेच गभीर आहेत. त्यावर जर आपण चितन केले नाही तर शेवटी आमच्या स्फूर्तीचा क्षय होईल दिवसानुदिवस स्फूर्ति जीर्ण होते. पण याकडे कार्यकर्त्यांचें लक्ष फार कमी आहे. गांधीजी असतानाहि हीच स्थिति होती. मी एका कार्यकर्त्याला विचारलें की, 'गाधीजीनी नुकताच एक लेख लिहिला आहे तो तुम्ही वाचला आहे काय ?' 'तेव्हा ते म्हणाले, 'नाही' मी त्याना म्हटलें, तो वाचण्यालायक होता. तेव्हा ते म्हणाले, 'तो वाचण्यालायक असेलच, कारण गांधीजी जे लिहितात ते वाचण्यालायक असतेंच. पण काम हेच त्याच्या उपदेशाचे सार आहे तें तर आम्ही करीतच आहोंत. या कामांतून आम्हाला फुरसत मिळाली नाही तर आम्ही तो कसा वाचणार ?' मी म्हटलें, 'कार्यकर्त्यांना वाचण्याची जरूर नव्हती, तर गाधीजीना तो लिहिण्याची तरी काय जरूरी होती ? तेहि कर्मपरायण पुरूष आहेत, पण तरी देखील दर आठवड्याला कांहीना कांही लिहीत असतात. तर त्यातून आपल्याला नव्या गोष्टी, नवा प्रकाश मिळण्याचा संभव आहे, म्हणून आपण ते लेख वाचले पाहिजेत.'

## ज्ञानच कामाचा आधार

'लोक वाचतात पुष्कळ परंतु त्यानी काम केलें पाहिजे,' असे गांधीजीनी लिहिले आहे, त्याचा हे कार्यकर्ते आधार देतात. पण त्याचा अर्थ इतकाच की, जे व्यर्थ वाचतात, व्यर्थ गोष्टीच्या चिंतनांत आपला काळ घालवितात, त्याला त्यांचा विरोध आहे. पण जे काम करतात तेच खरोखर ज्ञानाचे अधिकारी आहेत. वाचणे आणि चिंतन करणे हा त्यांचाच हक्क आहे जे काम करीत नाहीत, ते ज्ञानप्राप्तीचे अधिकारी नाहीत. अशानी ज्ञानाची चर्चा करीत रहावी, आणि जे कर्मपरायण आहेत, म्हणजे जे ज्ञानाचे खरे अधिकारी आहेत, त्यानी आपला हक्क सोडावा आणि ज्ञानाचें मूल्य समजू नये असे झाले तर कर्म निस्तेज बनते, हा अनुभव आमच्या कामात आला आहे आम्ही बोलत आहों, लिहीत आहो, तरी गेल्या दोन वर्षांत ज्या गोष्टी मी पन्नास पन्नास वेळा सांगितल्या, लिहिल्या, त्याहि गोष्टीचा पुनरुच्चार करावा लागतो. पण ते असो, त्यामुळे मी काही थकून जात नाही. मला ती एक जपासारखीच गोष्ट आहे

## चित्तशुद्धीची कसोटी

वस्तुस्थिति अशी आहे की, एखाद्या भक्तिमार्गी मनुष्याला चिंतनाची जितकी आवश्यकता असू शकते त्याहून अधिक जरुरी आपल्याला आहे कारण भक्तिमार्गी मनुष्य, व्यक्तिगत शुद्धि झाली म्हणजे संतोष मानतो, आणि म्हणतो की, 'त्याने जगाची जितकी सेवा होईल तितकी होवो!' आपल्याला एवढ्यावर संतोष नाही. व्यक्तिगत शुद्धीचे कामहि आपण आपल्या सेवेच्या द्वारे करतो. आमची बाहेरची सेवा आणि आंतील चित्तशुद्धीची

वृत्ति दोन्ही जेव्हां आपण एकरूप मानतों तेव्हां तर अधिक
खोलांत उतरून चिंतन करण्याची मोठी जबाबदारी आपल्याव
येते. ज्या अर्थी माझ्या आसपास माझ्या विचाराचा प्रभा
दिसत नाहीं त्या अर्थी माझ्यामध्येंच कांहीतरी उणेपणा आ
आणि त्यासाठी मला काहीतरी प्रायश्चित घेतलें पाहिजे अ
भक्तिमार्गी मनुष्यास वाटत नाही. ते समजत होते की, आस
पासच्या लोकाचीहि स्वतंत्र कर्मे असतात म्हणून त्यांच्या चित्त
शुद्धीची आमच्यावर जबाबदारी नाही. सहज भावानें एकमेकाच
परिणाम एकमेकावर होईल तेवढा होवो. पण आपण समाज
आणि व्यक्ति याच्यामध्यें असा भेद करीत नाही. आसपासच्य
वातावरणावर आणि परिस्थितीवर आपल्या कार्याचा काय
परिणाम झाला हीच आम्ही आमच्या चित्तशुद्धीची कसोटी
मानतों. आम्ही जर सत्यवादी आणि सत्यनिष्ठावान असू त
आमच्या आसपासच्या लोकामध्येहि निर्भयता आणि सत्यनिष्ठ
असली पाहिजे अशी आम्ही अपेक्षा राखतों. आमच्यापासू
कोणतीहि गोष्ट त्यानी लपवू नये आणि कोणी जर तशी लप
वीत आहे असे आम्हाला समजलें तर आमची सत्यनिष्ठा, सत्यो
पासना कमी आहे असें आम्ही मानतों. तेव्हा आपल्या चित्त
वृत्तीची कसोटी आसपासच्या वातावरणावरूनच ज्याना पारखा
वयाची आहे त्याच्यावर खूप खोलांत जाऊन विचार करण्याची
जबाबदारी येते.

## सत्याचा एक अंश

एक दिवस बापू सांगत होते कीं माझ्यांत सत्य फार कमी
आहे. त्याचें कारण त्यांनी असें सांगितले कीं, 'अमुक मनुष्य

इतके दिवस माझ्याजवळ राहिला आहे, तरी पण त्याने अमुक गोष्ट माझ्यापासून चोरून ठेवली आणि इतरलोकांपुढे त्याने ती उघड केली पण माझ्यापुढे येऊन सागण्याला त्याला धीर झाला नाही. मी खरा सत्यनिष्ठ असतों तर मलाच आधी सांगण्याची त्याला इच्छा झाली असती आणि दुसऱ्यांना सांगताना सकोच वाटला असता. आपली चूक, आपले दोष आईजवळ सांगतांना मुलाला भय वाटत नाही. पण झाले उलटेंच ! त्याने इतर मित्रांना ती गोष्ट सांगितली, परतु कित्येक वर्षे झाली तरीहि मला सागितली नाही. याचा अर्थ माझ्यामध्यें सत्य कमी आहे. सत्य असतें तर दुसऱ्या माणसाला माझ्यापुढे सत्य बोलण्याला धैर्य वाटलेच पाहिजे होते.' मी हे ऐकत होतो. त्यावर पुष्कळ चर्चा झाली. ती सर्व येथे सांगण्याची जरुरी नाही. त्यानी जे म्हटले त्यात सत्याचा अश आहे. पण ते पूर्ण सत्य नाही. त्याला दुसरीहि बाजू आहे. ती मी त्याना थोडक्यांत सागितली. मनुष्याचा एकमेकावर जो परिणाम होतो, मनुष्याची वृत्ति व आसपासची परिस्थिति याचा जो सबध येतो, तो अहिल्या-राम न्यायानें येत असतों. हा एक नवीन न्याय मी बनविला आहे. त्याचा अर्थ असा.

### अहिल्या-राम न्याय

रामचंद्र यात्रा करीत करीत एका आश्रमात आले. तेथील एका दगडाला त्यांच्या पायाचा स्पर्श होतांच त्याचा उद्धार झाला; आणि त्यांतून अहिल्या प्रगट झाली अशी कथा आहे. हा महिमा कोणाचा आहे ? रामाचा की अहिल्येचा ? रामाच्या चरणाचा महिमा म्हणावा तर त्याच्या चरणाचा स्पर्श लाखों दगडाना झाला, पण त्या सर्वांतून कांही अहिल्या प्रगट झाली नाही

तेव्हां हा महिमा फक्त रामाच्या चरण-स्पर्शाचा नाहीं. ज्या दगडामध्यें अहिल्या सुप्त होती त्या दगडाचा तो गुण आहे; असे जर म्हणावें तर हजारों पायांचा स्पर्श त्या दगडाला झाला, तरी त्याचा उद्धार झाला नाहीं. रामाच्याच पायाच्या स्पर्शानें त्याचा उद्धार झाला तेव्हां तो अहिल्येचाहि पूर्ण महिमा नाही. अशा रीतीनें कांहीं गुण रामाचे आणि कांहीं अहिल्येचे. दोघाचे गुण मिळून एक गोष्ट घडून आली. तिची जबाबदारी फक्त कोणातरी एकावर घालण्यानें पूर्ण न्याय होत नाही. ही गोष्ट मी बापूना सांगितली. आणखी बरीच चर्चा झाली, ती मी येथे सांगत नाही. पण आपण जर सत्यनिष्ठ असलों तर त्याचा परिणाम आसपासच्या वातावरणावर झाला पाहिजे ही बापूची अपेक्षा मिथ्या नाही. पण भक्तिमार्गी सत्पुरुष अशी अपेक्षा ठेवीत नाहीत. ते 'म्हणतात जग ईश्वराच्या इच्छेनें चालते. तेव्हां माझ्या स्पर्शानें वाघाने वाघपण सोडावें आणि गायीने गायपण सोडावें हें कांहीं आवश्यक नाही. एक भक्त तर मला असे म्हणाला कीं, ईश्वर असून सुद्धां जर जगांत बदमाश राहूं शकतात, तर मी असतांनाहि बदमाश राहतील तर त्यांत आश्चर्य काय? मी काय ईश्वरापेक्षां मोठा लागून गेलो आहे; की माझ्या संगतीनें दुष्ट सुधारावेत! हा भक्तिमार्गाचा युक्तिवाद आहे. यांत परम नम्रता आहे. अहंकाराचा पूर्ण अभाव आहे आणि त्या दृष्टीने सत्याचा एक अंशहि त्यांत आहे.

## भक्तिमार्गाचा युक्तिवाद

परंतु आम्ही सत्याग्रही या नात्यानें असें मानतों कीं आमची चित्तवृत्ति शुद्ध असेल तर आसपासच्या वातावरणा-

वरहि त्याचा परिणाम झाला पाहिजे. या कल्पनेच्या आधारा-वरच आम्ही सत्याग्रहाची योजना केली आहे. सत्याग्रहाच्या तत्वज्ञानात हा एक मूलविचार आहे. हा विचार जर आपण मानला तर आपल्यावर मोठी जबाबदारी येते. जीवनाच्या खोलात आपल्याला शिरले पाहिजे, भक्त जितक्या खोलवर पोहोंचले होते त्याहून अधिक खोलांत आपल्याला शिरावें लागेल; तसें झाले नाही तर आमचा आचार टिकणार नाही. आमचा स्वतःचा जेथपर्यंत सबध आहे तेवढ्यापुरता तो टिकेल, कारण तो टिकविण्याचा आपण निग्रहाने प्रयत्न करूं, पण सार्‍या हिंदुस्थानांत तो रूढ होणार नाही. कारण हिंदुस्थान एक तत्वज्ञानाची भूमि आहे. प्रत्येक गोष्टीत खोलांत जाण्याची येथल्या लोकांना सवय आहे.

## गीतेच्या तत्वज्ञानाची गंभीरता

बुद्धधर्मानें प्रयोग करून पाहिला. त्यांनीं आपली चळ-वळ काही आचारापर्यंत, कांही सामाजिक सुधारणेपर्यंतच मर्यादित ठेवली. ते तत्वज्ञानात खोल शिरले नाहीत. परिणाम असा झाला कीं, बुद्धधर्माचा कांही थोडा कल्याणकारी स्पर्श हिंदु-स्थानाला झाला तेवढा झाला. पण बुद्धधर्म हिंदुस्थानांत टिकला नाही. कारण खोलांत शिरून मूलतत्वज्ञानापर्यंत पोहोंचलें पाहिजे, तें बुद्धधर्मानें केलें नाहीं. असो. हा एक गंभीर विषय आहे. त्यात मी येथें पडू इच्छित नाहीं. फक्त उल्लेख करून सोडून देतों. माझ्या म्हणण्याचें सार असें आहे कीं, या भारतभूमीमध्यें विचाराच्या खोलीत शिरल्याशिवाय जीवनाचा व्यवहार टिकू शकत नाही. लढाई करावी कीं, न करावी हा एक साधा प्रश्न

उत्पन्न झाला होता. तेव्हां भगवद्‌गीता किती खोल गेली आहे ते पहा ! क्षेत्र क्षेत्रज्ञ विचाराचें पृथक्करण काय केले, प्रकृति-पुरुषाचा विचार किती सांगितला, आत्मस्वरूपाचें केवढे वर्णन केले, अशा हजार गोष्टी सांगितल्या, तेव्हांच शेवटी मोहनिवृत्ति झाली आणि कर्तव्य करावयास बुद्धि स्थिर झाली. हिंदुस्थानची भूमिका आपल्याला माहित नसेल तर एखाद्या साध्या प्रश्नावर इतकें खोल कां जावें लागलें हें आपल्या लक्षांत येणार नाही. तेव्हां आम्ही खोल विचार करीत नाही, हा आमच्यांतील एक मोठा दोष आहे. तो आपण काढून टाकला पाहिजे, तरच आमच्या हातून मोठें काम होईल.

## मिळून काम केलें तरच शक्ति निर्माण होईल

तिसऱ्या दोषाचा उल्लेख मी माझ्या पहिल्या व्याख्यानांतच केला आहे, पण त्याचा पुनरुच्चार करतों. आपल्यामध्ये शक्ति कमी नाहीं आणि लोकांना आमच्यापासून अपेक्षाहि पुष्कळ आहे. असें असूनहि आमचीं सर्व कामें अलग अलग अशी चालली आहेत. एकाच्या कामाचा दुसऱ्याला पत्ता नाही, अशी स्थिति आहे. याचा परिणाम असा होतो की प्रत्यक्ष रूप काही प्रकट होत नाहीं. एका माणसाजवळ तेलाच्या बाटल्या पडल्या आहेत, दुसऱ्याजवळ आगपेटयांची रास आहे आणि तिसऱ्याजवळ पुष्कळ कंदिल पडले आहेत, पण जोंवर हे तिघे एकत्र येत नाहींत तोंवर प्रकाश मिळणार नाहीं; अंधःकार जाणार नाही. असें आमचें होत आहे. कताईमंडळें स्थापित होत आहेत. कांततात बिचारे आठवड्यांतून एक दिवस ! जमतात एके ठिकाणी. काही काम करतात; अन् घरी निघून जातात. त्यांचा प्रचार जगांत

कांहीं होत नाहीं. त्यांची स्वतःची स्फूर्तिहि दिवसेंदिवस कमी होत जाते. ५० मडळें स्थापन झाली, त्यातली २५ बंद पडलीं; उरलेल्या २५ च्या कामाचा इतरांना पत्ता नाही. कताईमंडळे कोठें आहेत, याचा ग्रामोद्योग सघाला पत्ता नाही. संघाकडे यादी आली तर ती पाहण्याची जबाबदारी संघाला वाटत नाही. ग्रामोद्योग नीट चालत नसतील तर त्या बाबतीत जागरूक राहण्याची जबाबदारी चरखासघाला वाटत नाही. अशा तऱ्हेने आमचें सर्व काम चालले आहे. हें माहित झालेले असूनहि गेली चार पांच वर्षे ते तसेंच चालले आहे. आम्ही एक मोठे काम हाती घेऊन सारी शक्ति त्यावर केंद्रित केल्याशिवाय ते होणार नाही. या गोष्टीकडे लोकांचे लक्ष वेधले पाहिजे असे यावेळी मला वाटतें.

## सर्व-सेवा-केंद्रांमधूनच सर्व काम व्हावें

जयप्रकाशजी एकदा म्हणाले होतें की, 'सर्वांचा मिळून एक सघ बनला तर बरें होईल ! आम्ही सगळे वेगळे वेगळें काम करतों, त्यामुळे कामाला जोर चढत नाही.' एक सुहृद् आणि मित्र या नात्याने त्यांनी ही सूचना केली होती आणि मला सांगावयाला आनंद वाटतों की, त्यासबधी गभीरपणे विचार सुरू आहे. आता इतर मुख्य सघ सर्व-सेवा-सघांत विलीन होऊन सर्व-सेवा-संघ एकरूप बनून जाईल असा सभव आहे. तसा निर्णय झाला म्हणजे लोकांपुढें येईलच ! फुटीरपणाचे दोष लहान कार्यकर्त्यांमध्ये कमी आहेत ते मोठ्या कार्यकर्त्यांमध्येच आहेत. ते जो रस्ता दाखवितात, त्या रस्त्यानेंच छोटे लोक जातात. आतां जे नवीन काम सुरू होईल, तें सर्व-सेवा-

संघाचेंच होईल, आणि त्या ठिकाणी समग्र ग्रामसेवेचें काम चालेल. केवळ कताईमंडळच चाललें आहे, असें यापुढे होणार नाही. जे चालेल ते सर्व-सेवा-संघाचें चालेल. त्यांत कताई, ग्रामोद्योग, मूलोद्योगी शिक्षण, हरिजन सेवा, वगैरे सर्व कामें एकत्र चालतील. कार्यकर्त्याच्या शक्ति व वृत्तीला अनुसरून एखादे काम अधिक जोरानें चालेल. कार्यकर्ता आणि तेथील परिस्थिति यामुळे जो काही फरक असेल तेवढाच राहील. पण जें चालेल तें सर्व-सेवा-संघाचें केंद्र म्हणून सर्वांगी दृष्टीनें चालेल. यासंबंधी वाटाघाट चालू आहे. हा दोष निघून जाईल असें मला वाटतें. तरीहि कार्यकर्त्यांचें लक्ष ह्या दोषांकडे वेधावें आणि सर्वांगी दृष्टि ठेऊन सर्वांनी मिळून काम करावें ही गोष्ट येथे सांगणे मला अवश्य वाटलें नाही तर आज चाललेलें काम थोडे दिवस चालेल आणि पुढे सर्वच काम बंद पडेल.

## प्रार्थना अंतःकरणपूर्वक व्हावी

शेवटी आणखी एक गोष्ट सांगावयाची आहे. रोज सकाळ संध्याकाळ आपण जी प्रार्थना करतो, तिच्यामध्यें गंभीरपणा असत नाही, असें मला दिसून आले आहे. पुष्कळ संस्थांमध्यें प्रार्थना म्हणजे सदाचार किंवा शिष्टाचार एवढेंच तिला महत्व उरलें आहे. सदाचार ही चांगली गोष्ट आहे. परंतु अंतःकरणापासून केलेल्या प्रार्थनेत जो अनुभव येतो, तो या केवळ सदाचारामुळें येत नाही. गांधीजींनी आपल्या आचरणानें आणि मरणानेंहि आपल्याला धडा घालून दिला आहे. ज्या दिवशी त्यांचा देह पडला त्यावेळी ते प्रार्थनेच्या उत्साहांत होते. आणि प्रार्थनामय होऊन त्यांनीं आपला देह ठेवला. त्यांच्या शरीरांत गोळी घुसली, तेव्हां त्यांनी परमेश्वराचेंच नांव घेतलें ही कांही सामान्य गोष्ट

नाहीं. दोन्ही वेळीं प्रार्थना करतांना, केवळ सदाचार म्हणून नव्हे तर आपलें हृदयहि परमेश्वरचरणी लीन होऊन जावें याविषयी ते निरंतर जागृत असत. ते म्हणतच ' प्रत्येक श्वासाबरोबर माझी प्रार्थना चाललेली असते.' हें त्याचें म्हणणें केवळ काल्पनिक किंवा अलंकारिक नव्हे तर प्रार्थना हीच त्याच्या जीवनातील मुख्य गोष्ट होती. पण आम्ही मात्र प्रार्थनेला शिष्टाचारापेक्षा अधिक महत्व देत नाही. आता येथेच पहाना ! खाण्या-जेवण्याची किती व्यवस्था केली आहे. आशादेवीनी आपली तालीमीसंघातील मडळी बोलावली आहेत बिहारचे सारे लोकहि आपल्याला चागले खाणें मिळावें म्हणून खटपट करीत आहेत. जेवण्या-खाण्याची आम्ही इतकी व्यवस्था केली आहे पण प्रार्थनेकरितां कांही योजना, चिंतन केलें आहे का ? आम्ही प्रार्थना तर करीतच आहोंत आणि प्रार्थनेकरिता काही बाहेरच्या खास गोष्टी करण्याची आवश्यकता आहे असें नाही. जे करावयाचे आहे ते अंत.करणात करावयाचें आहे ते एका क्षणात होऊनहि जाते. त्यासाठी जास्ती वेळ द्यावा लागतों असेहि नाही. ही गोष्ट जर आपण लक्षात घेतली तर ती प्रार्थना आपल्याला बळ देईल. आपण जे एक एक नवीन कठीण काम हाती घेत आहोत तें पूर्ण करावयास परमेश्राशिवाय दुसरा कोठला आधार आहे ? त्याचा जर आधार अंतकरणापासून घेतला नाही तर सत्यादि धर्मावरहि आपण अविचल राहू असें आपल्याला सांगतां येणार नाही.

## नीतिधर्माची प्रेरणा–अंतःसमाधान

शंकरराव आतां म्हणाले की आमचें जें काम चाललें आहे त्याचा अनुभव इहलोकांतच यावयाचा आहे. लोक पूर्वीच्या

काळी यात्रा, यज्ञ वगैरे करीत ते परलोकावर दृष्टि ठेऊन करीत. हा आमच्या आणि त्यांच्या कामात फरक आहे. हा त्यांनी दाखविलेला फरक बरोबर आहे. पण तेव्हा तरी परलोकाचें नांव कां घेतलें जात होतें? एखाद्या व्यक्तीला 'तू सत्य कधीहि सोडू नको. त्यामुळे तुझें नुकसान होणार नाही. लाभच होईल.' असे जर आपण सागितलें तर तो म्हणेल 'अमक्या वेळी मी खरे बोललों तर माझें नुकसान होईल आणि खोटे बोललों तर माझा ऐहिक फायदा होणार आहे. तर आपण त्याला काय सागाल? कोणत्याहि स्थितीमध्ये देशाच्या हिता-साठीं सुद्धा किवा कोणाचे प्राण वाचविण्याकरिता देखील असत्य बोलता उपयोगी नाही, अशी ज्याची अविचल सत्यनिष्ठा आहे· ते आपल्या म्हणण्याला काय आधार दाखवतील? ते एका विशिष्ट चाकोरीत विचार करीत असत. त्यानी परलोकाचा आधार सागितला. ते त्याला म्हणतील, 'असत्य बोलून इहलोकी लाभ झालासा दिसेल, पण परलोकी होणार नाही. इहलोक थोड्या दिवसाचा आहे. परलोक कायमचा आहे. थोड्या दिवसाच्या लाभाकरिता परलोकचा कायमचा लाभ सोडणे चागले नाही." ती एक बालभाषा होती. बालभाषा म्हणजे अविकसित भाषा. विकसित भाषेत बोलावयाचें म्हणजे "आपण जर असत्य बोललों तर अंत:समाधान मिळणार नाहीं." असें सांगावें लागेल. अत:समाधानाची कल्पना समजणे आणि समजावून सांगणे कठीण होते. तेव्हां मृत्यूनंतरच्या जीवनाची म्हणजे परलोकाची भाषा उपयोगांत आणली जात होती. तेव्हां अंत:समाधानाचा आधार घ्या, किवा परलोकच्या जीवनाचें नांव घ्या. कोणत्याहि स्थितींत सत्यादि नीतिधर्मावर कायम राहणें ही मुख्य गोष्ट

आहे. ती साधण्याकरिता परलोकांतल्या आत्मकल्याणापासून प्रेरणा घ्या, किंवा अंत:समाधानाच्या नांवावर ती मिळवा. सत्यादि नीतिधर्माचें पालन करण्यासाठी अंत:समाधानापेक्षां दुसरी कोणतीहि मोठी प्रेरणा नाही असें आम्ही मानतों. परंतु ज्यानी त्याकरिता परलोक वगैरेचा आधार घेतला त्यानी चूक केली असें नाही कारण सत्यनिष्ठा अविचलित राहावी हाच त्यांचाहि हेतू होता. ही एक गोष्ट सहज प्रसंग आला म्हणून सांगितली पण माझ्या म्हणण्याचे तात्पर्य असें आहे की आपण जगामध्ये आपल्याला कोणी हसत आहेत असें दिसले तरी आपला धर्म सोडता उपयोगी नाही. सत्यनिष्ठेवर अविचलित राहिलें पाहिजे. तसें राहावयाला आपल्याला ईश्वराच्या प्रार्थनेशिवाय दुसरा कोठलाहि मोठा आधार नाही. म्हणून आपल्या सर्व कामामध्ये परमेश्वर निष्ठेवरच आधार ठेवावा आणि त्याकरितां आपण जी प्रार्थना करतों ती खऱ्या अंत:करणापासून करावी एवढेंच माझे सागणें आहे.

शेवटचे दोन शद्ब सांगतों. पुढच्या वर्षी आम्हांला जे काम करावयाचें आहे. त्याकरिता कमीत कमी एक वर्षभर आपला सर्व वेळ देणारे लोक पाहिजे आहेत. जे लोक तयार असतील, त्यानी आपली नांवें सर्व-सेवा-संघाकडे द्यावीत. त्यांना महिना दोन महिने शिक्षण देण्याची व्यवस्था केली जाईल. आणि त्यांच्या सेवेचा उपयोग केला जाईल.

* * *

# विनोबांचें प्रकाशित वाङ्मय



| | | रु | आ |
|---|---|---|---|
| १ | मधुकर .. .. .. .. | १ | ८ |
| २ | जीवन-दृष्टि .. .. .. | १ | १२ |
| ३ | सर्वोदय-विचार .. .. .. | १ | ४ |
| ४ | क्रात-दर्शन .. .. .. | १ | ४ |
| ५ | गीताअी (ठळक) .. .. .. | ० | ८ |
| ६ | ,, (लोकनागरी) .. .. .. | ० | ४ |
| ७ | ,, .. .. .. | ० | ३ |
| ८ | गीता-प्रवचने .. .. .. | १ | ८ |
| ९ | गीताध्याय-सगति .. .. .. | | |
| १० | स्थितप्रज्ञ-दर्शन .. .. .. | १ | ८ |
| ११ | गीताअी-शद्बार्थ कोष .. .. .. | ४ | ८ |
| १२ | ,, ,, ,, पक्की बाधणी .. .. | ५ | ० |
| १३ | उपनिषदाचा अभ्यास .. .. .. | २ | ० |
| १४ | ईशावास्य वृत्ति .. .. .. | १ | ८ |
| १५ | स्वराज्य-शास्त्र .. .. .. | ० | १० |
| १६ | ज्ञानदेवाची भजने .. .. .. | १ | ८ |
| १७ | नामदेवाची भजने .. .. .. | ० | १० |
| १८ | एकनाथाची भजने .. .. .. | ० | १२ |
| १९ | एकनाथाची भजने, प्रस्तावना खड .. .. | ० | ८ |
| २० | लोकनागरी लिपि .. .. .. | ० | ५ |
| २१ | राम-नाम .. .. .. .. | ० | ८ |
| २२ | तेरा दिवस .. .. .. | ० | ८ |
| २३ | वेडछी आश्रमात .. .. .. | ० | ८ |
| २४ | संताचा प्रसाद .. .. .. | १ | ० |
| २५ | अभग-व्रते .. .. .. .. | ० | ६ |
| २६ | विचार-पोथी .. .. .. | १ | ८ |

